॥ श्री ॥ 

# अष्टादश-स्मृतिसार.





लेखक

श्री. विष्णु बळवंत थोरात ज्योतिषी,

पो० पालशेत जि० रत्नागिरी.



मुद्रक व प्रकाशक,

दत्तात्रय गोविंद सडेकर

यांनीं खानापुर येथें आपल्या धनंजय छा० छा०
तेथेंच प्रसिद्ध केलें.



आवृत्ति १ ली

सन १९१६ इसवी.



किंमत ५ आणे.

Sow. T. R. Malati Bai.

# दोन शब्द.

या लहानशा पुस्तकांत सर्ववंद्य अशा प्रसिद्ध १८ स्मृतिकारांच्या स्मृतिवचनांतील निवडक रहस्यांचा अनुवाद आमचे मित्र श्री. वि. ब. थोरात यांनीं केला आहे. हे वेंचे आबालवृद्धांस सारखे संस्मरणीय असल्यामुळें अमक्यानेंच वाचावेत व अमक्यानें वाचूं नयेत असा प्रतिबंध नाहीं.

मुलांनीं वाचले असतां त्यांस बहुश्रुतपणा येईल, धर्मज्ञान होईल, नीतिज्ञानाची ओळख पटेल. स्त्रियांनीं वाचले असतां त्यांस पती-पत्नीधर्म कळून संसारदक्षता प्राप्त होईल, त्याचप्रमाणें थोर गृहस्थांनीं वाचले असतां त्यांचेंही योग्य प्रकारें समाधान होईल, नवीन गोष्टी किती तरी कळतील, यासाठीं सर्वांनीं या लहानशा पुस्तकास आश्रय द्यावा अशी नम्र विनंति आहे.

हा प्रयत्न लोकांस आवडला तर पुढील आवृत्ति मूळ संस्कृत [व]चनांसह प्रकाशीत करण्याचा आमचा विचार आहे.

फार पाल्हाळ न करितां मुख्य गोष्टी मात्र या पुस्तकांत घेतल्या [आ]हेत. यापेक्षां ज्यांना विशेष विस्तार पाहणें असेल त्यांनीं मूळ [सं]स्कृत ग्रंथ पहावा. ( श्रीवेंकटेश्वर स्टीमप्रेस-मुंबई यांजकडे ॥ रुपयास छोटा गुटका मिळतो. )

ज्या दयाघन परमेश्वराच्या कृपेनें हें काम पूर्ण होत आहे [त्यास] [वि]नय प्रणाम असो. ज्या उदार आश्रयदात्यांच्या प्रोत्साह[नानें हें पुस्]तक प्रकाशित करण्याचा योग आला त्यांस तो परम[ेश्वर सुखी ठेव]ो ठेवो.

खानापुर. ता. २०-३-१९१६.

नम्र
[illegible]

# अनुक्रमणिका.

# अष्टादश स्मृतिसार.



## मनु-स्मृति.

परमेश्वरानें ह्या सृष्टीच्या अभिवृद्धीकरितां ब्राह्मणादि जे चार वर्ण निर्माण केले, त्यांच्याकरितां दृष्ट व अदृष्ट फळें देणारीं भिन्न भिन्न कर्मेंहि त्यानें नियत केलीं.

शिकविणें, शिकणें, यज्ञ करणें, यज्ञ करविणें, दान व प्रतिग्रह हीं सहा कर्में त्यानें ब्राह्मणांकरितां ठरवून दिलीं.

प्रजेचें रक्षण, दान, यज्ञ, अध्ययन व विषयांच्या ठाईं अनासक्ति हीं संक्षेपतः क्षत्रीयांचीं कर्में होत.

पशूंचें रक्षण, दान, यज्ञ, अध्ययन, वाणिज्य (व्यापार) व्याजबट्टा व शेती हीं वैश्यांचीं कर्में होत.

ह्या तीन वर्णांच्या लोकांची परिचर्या (सेवा), त्यांच्या गुणाचे ठायीं दोषदृष्टि न ठेवितां, करणें हें एकच कर्म प्रभूनें शूद्रांकरितां नेमून दिलें आहे.

### संस्कारादि

ब्राह्मणाचें नांव मंगलवाचक, क्षत्रियाचें बलवाचक, वैश्याचें धनसंयुक्त व शूद्राचें सामान्य असावें.

स्त्रियांचीं नावें सहज उच्चारतां येणारीं, अर्थ स्पष्ट व्यक्त होणारीं, मनोहर, मंगलवाचक, दीर्घ स्वरांत व आशिर्वाद वाचक शब्दयुक्त असावींत.

आपण भोजन करून राहिलेलें उष्टें अन्न कोणालाहि [illegible] नये. तसेंच मध्यान्हीं व सायंकाळीं असें दोनदां [illegible]जन करावें. मधील काळांत कांहीं खावूं नये. अति [illegible]जन करूं नये व उष्ट्या हातानें बाहेर जाऊं नये.

अति भोजन करणें हें आरोग्यास हितकर नाहीं; म्हणजे रोगांस वाढविणारें व आयुष्यहानि करणारें आहे. स्वर्ग [illegible]ठवून देणाऱ्या योगादि क्रियांस तें विरोधी आहे. तें [illegible]प्राहि देत नाहीं. उलट खादाड म्हणून निंदा करविण्यास [illegible] कारण होतें.

सर्व ( पंच ज्ञानेंद्रियें, पंच कर्मेंद्रियें व मन ) इंद्रियां-[illegible] जर एखादेंहि इंद्रिय विषयासक्त झालें तर त्याविषयीं [illegible]प्राचें तत्वज्ञान, दुसऱ्या इंद्रियांच्या द्वारांही क्षीण होतें. [illegible]ज्याच्या पाण्याच्या पिशवीतून एकाच छिद्राच्या द्वारां [illegible] पिशवींतील सर्व ठिकाणचें पाणी गळून जातें तसाच [illegible]ज्ञानाचा प्रकार होतो. यास्तव एखाद्याहि इंद्रियास विषयीं [illegible] देऊं नये.

बाह्य इंद्रियसमूहास स्ववश करून व तसेंच मनाचें [illegible]मन करून सर्व पुरुषार्थांस उपायांच्या योगानें सिद्ध [illegible]न घ्यावें; पण शरीरास पीडा देऊन उपायांचें अनुष्ठान [illegible] नये.

## स्नातक व्रतें.

ज्यामध्यें दुसऱ्यास पीडा होत नाहीं त्यास अद्रोह; म्हण-[illegible] अशा अद्रोह वृत्तीनें चरितार्थ चालवावा.

गाय पाणी पिऊं लागली असतां तिचें निवारण करूं नये. ज्या ग्रामांत अधार्मिक लोक रहात असतील तेथें आपण राहूं नये, काशाच्या पात्रामध्यें कधींहि पाय धुवूं नयेत. तांबें, रुपें व सोनें या धांतूंवांचून दुसऱ्या कोणत्याहि धातूचें भांडें फुटकें असल्यास त्यांत भोजन करूं नये. ज्याविषयीं मन साशंक होतें त्यास भावदूषित ह्मणतात. अशा भावदूषित स्थळीं भोजन करूं नये. कोंवळें ऊन, प्रेताचा धूर, फाटकें आसन हीं वर्ज्य करावींत. दातांनीं नखें उपटूं नयेत. नखांनीं गवत तोडूं नये. बैलाच्या पाठीवर बसून जाऊं नये. रात्रीं वृक्षाखालीं राहूं नये. आपले सुद्धां जोडे हातांतून कोठें नेऊं नयेत. करमणूक ह्मणून सुद्धां फाशांनीं खेळूं नये. शय्यादिकांवर बसून खाऊं नये. हातांत एकदम पुष्कळ अन्न घेऊन थोडथोडें खात बसूं नये. आसनावर भोजनपात्र ठेऊन त्यांतून भक्षण करूं नये. नागव्यानें निजूं नये. भोजनापूर्वीं अवश्य पाय धुवावे; पण ओल्या पायानीं निजूं नये.

विद्या, वय, अधिकार यांनीं जो श्रेष्ठ आहे तो ज्या शय्येवर निजला असेल किंवा ज्या आसनावर बसला असेल, त्यावर आपण त्याच्यासमक्ष बसूं नये; व स्वतः निराळ्या आसनावर बसलें असल्यास गुरुजन तेथें येतांच त्यांस नमस्कार करावा. याप्रमाणें उठून सदा वृद्धांस अभिवादन करणाऱ्या व त्यांची सेवा करणाऱ्या विद्यार्थ्याचीं आयुष्य, विद्या, यश व बळ हीं चार अतिशय वाढतात.

जी परस्त्री असेल व जिचा आपला कांहीं संबंध नसेल तिला बाई, सुभगे किंवा भगिनी असें ह्मणावें.

ब्राह्मणांस विद्येच्या योगानें, क्षत्रीयांस शौर्यानें, वैश्यांस धान्य, वस्त्र इत्यादि धनांच्या योगानें व शूद्रांस जन्माच्या योगानें श्रेष्ठत्व प्राप्त होतें. मस्तकावरील केंस पिकले आहेत एवढयाच कारणानें कोणी वृद्ध ( श्रेष्ठ ) होत नाहीं; तर जो तरुण असूनही विद्वान् असतो, त्यासच देव वृद्ध ( श्रेष्ठ ) असें समजतात.

काष्टाचा हत्ती, चामड्याचा हरीण व अध्ययन न करणारा ब्राह्मण हे तिघेही केवळ नामधारी आहेत.

ज्याची वाणी व मन हीं दोन्हीं असत्य भाषण व रागद्वेषादि दोष यांपासून अलिप्त आहेत व निषिद्ध व्यवहारापासून सतत सुरक्षित आहेत त्यास वेदांत सांगितलेलें सर्व फळ प्राप्त होतें.

आचार्य, जनक, जननी व सख्खा जेष्ठ भ्राता यांच्याकडून जरी पीडा झाली असली तरी कोणी, विशेषतः ब्राह्मणानें, त्यांचा अपमान करूं नये.

अपत्याच्या गर्भाधानापासूनच मातापित्यांस जे क्लेश सोसावे लागतात, त्यांची फेड अपत्याच्या हातून शेंकडों वर्षांनीं तर काय, पण शेंकडो जन्मांनींही होणें शक्य नाहीं; सबब माता व पिता यांचें नित्य प्रिय करावें व आचार्यास सर्वदा प्रसन्न करावें. तीं तिघें प्रसन्न झालीं असतां चांद्रायणादि सर्व तप फलांसह प्राप्त होतें. त्या तिघांची सेवा

हेंच परम तप होय. त्यांच्या आज्ञेवांचून दुसऱ्या कोणत्याही धर्माचें अनुष्ठान करूं नये.

विषापासून अमृत काढून घ्यावें; बालकाचेंहि हितकर वचन ऐकावें; शत्रूपासूनहि सदाचरण शिकावें; अपवित्र पदार्थांत पडलेलेंहि सुवर्णादि उच्च प्रतीचें द्रव्य उचलून घ्यावें. सारांश, स्त्रिया, रत्नें, विद्या, धर्म, शौच, सुभाषित व चित्रलेखनादि विविध कला हीं सर्व मिळतील तेथून संपादन करावींत.

भोजनानंतर निमित्तावांचून केवळ मौजेखातर स्नान करूं नये. रोग्यानें तर नैमित्तिक स्नानही करूं नये. स्नानाचा पर्याय ( हात, पाय धुणें इ० ) करावा. तसेंच अपरात्रीं ह्मणजे रात्रीच्या दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरीं स्नान करूं नये. ज्यामध्यें सुसरी वगैरे आहेत व पाण्याचा अंत समजत नाहीं अशा जलाशयामध्यें स्नान करूं नये.

आपली वृद्धि व्हावी अशी ज्यास इच्छा असेल त्यानें क्षत्रिय, सर्प व बहुश्रुत ब्राह्मण हे जरी कांहीं काल दुर्बळ झाले असले तरी त्यांचा अपमान करूं नये. कारण, ह्या तिघांचा अपमान केला असतां प्रसंग आल्यावर ते पुरुषास जाळून सोडतील. यास्तव बुद्धिमान् चतुर मनुष्यानें ह्या तिघांचा कधींही अपमान करूं नये.

सर्व परवश कर्म दुःख देणारें असतें. सबब त्याचा त्याग करावा. आपल्या आधीन असलेलें सर्व कर्म सुखकारक असतें. तें प्रयत्नपूर्वक करावें.

जो अर्थ व काम धर्माच्या विरुद्ध असेल त्यास सोडावें. परिणामीं दुःख देणारा व लोकांत निंद्य समजला जाणारा धर्महि सोडावा.

आरंभिलेलें कार्य शेवटास नेणारा, शांत स्वभावाचा, शीतोष्णादि द्वंद्वें सहन करणारा व परहिंसेपासून निवृत्त झालेला असा जो असेल, तोच इंद्रियनिग्रह व दान ह्यांच्या योगानें स्वर्गास जिंकतो.

सर्व आश्रमांमध्यें गृहस्थाश्रम श्रेष्ठ आहे. कारण वेद व स्मृति यांच्या विधानाप्रमाणें अनुष्ठान करून तो इतर तिन्ही आश्रम्यांस भिक्षादि देऊन पोसतो.

## राजधर्म

इंद्र, वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र व कुबेर यांचे सारभूत असे अंश काढून त्यांच्यायोगानें प्रभूनें राजाला बनविलें आहे.

राजानें आपल्या सर्व कामगारांच्या वर्तनावर सूक्ष्म नजर ठेवावी. कारण राजानें रक्षणाकरितां ठेवलेले अधिकारी प्रायः परस्वापहार करणारे व वंचक असतात. यास्तव राजानें आपल्या प्रजेचें त्यांच्यापासून रक्षण करावें.

## स्त्रीपुरुषधर्मादि

दुःशीलास कारण होणाऱ्या थोड्याशा समागमापासूनहि विशेषतः स्त्रियांचें रक्षण. करावें. कारण त्यांचें रक्षण न केल्यास त्या पिता व पति या दोघांच्याही कुलास संताप देतात. अंध, पंगु इत्यादि दुर्बलांनींहि भार्येचें रक्षण कर-

ण्याचा प्रयत्न करावा. कारण भार्येचें रक्षण करणारा पुरुष शुद्ध संततीच्या द्वारां आपल्या पुढील वंशाचें, शिष्टाचाराचें, पिता, पितामह इत्यादि मागच्या कुळाचें, विशुद्ध संतानाच्या योगानें होणाऱ्या और्ध्वदेहिकादि कर्मांच्या योगानें आपलें व शुद्ध भार्येच्या संबंधामुळें प्राप्त होणारा जो अध्ययनाचा अधिकार त्याच्यायोगानें स्वधर्माचें रक्षण करितो.

धनसंग्रह करणें, त्याचा विनियोग करणें, द्रव्य व शरीर यांस शुद्ध करणें, पतिशुश्रूषा इत्यादि कर्म करणें, स्वयंपाक करणें, शय्या, आसन, पात्रें इत्यादिकांची देखरेख करणें, ह्या कामांत स्त्रीचें मन गुंतवावें.

मद्यपान, दुर्जनसमागम, पतीपासून दूर राहणें, इकडे तिकडे भटकणें, अयोग्य वेळीं निजणें व दुसऱ्याच्या गृहीं राहणें, हीं सहा स्त्रियांस वर्ज; सबब त्यापासून त्यांचें रक्षण करावें.

स्त्रियांमध्यें जरी दोष सांगितले आहेत तरी त्या गर्भोत्पत्त्यर्थ मोठ्या उपकारक, अनंत कल्याणाचें जणुं काय पात्र आहेत. त्या वस्त्रें अलंकार इत्यादि देऊन सन्मानास योग्य व आपल्या गृहास शोभा देणाऱ्या आहेत. सारांश, गृहामध्यें स्त्री व श्री या दोघी सारख्याच आहेत.

कांहीं कार्य उद्भवलें असतां, देशांतरीं जाणें झाल्यास पुरुषानें पत्नीच्या अन्नवस्त्राची तजवीज करून जावें. * * * त्याच्यामागें स्त्रीनें देहास सुशोभित करणें, परगृहीं गमन करणें इत्यादि न करितां, ह्मणजेच नियमयुक्त होऊन

रहावें व अन्नवस्त्रादि न देतां तो गेल्यास सूत काढणें, शिवणें, कशिदा काढणें इत्यादि अनिंद्य शिल्पावर आपला निर्वाह करावा.

भार्या व पति यांच्या मरणापर्यंत धर्म, अर्थ व काम यांमध्यें परस्पर व्यभिचार न होणें हाच संक्षेपतः स्त्री-पुरुषांचा श्रेष्ठ धर्म होय. पुरुषानें आमरणांत व्यभिचार न करितां स्त्रीव्रतानें रहावें.

कोणाची हिंसा न करणें, यथार्थ भाषण करणें, अन्यायानें परधन न घेणें, मृत्तिका व जळ यांच्यायोगानें शरीरास शुद्ध करणें व इंद्रियांचा संयम करणें हा धर्म संक्षेपतः चारी वर्णांच्या लोकांस सांगितला आहे.

## प्रायश्चित्तादि

मनुष्यानें आपल्या कुटुंबांतील माणसास दुःखी व हाल-अपेष्टेंत ठेवून दानधर्म केल्यास, त्यापासून पुण्य न लागतां पातकच लागतें.

स्वकर्महीन दुर्जन यांपासून—प्रसंगीं बलात्कारानेंहि—धन घेऊन तें सज्जनांस अर्पण करण्यांत पुण्य आहे.

ब्रह्महत्या, मद्यप्राशन, गुरुस्त्रीशीं गमन, चौर्य व कुसंगति हीं पांच महापातकें होत.

बुद्धिपूर्वक किंवा अबुद्धिपूर्वक निषिद्ध कर्म घडलें असतां त्याच्या पापापासून मुक्त होण्याची इच्छा करणाऱ्यानें पुन्हां तें कर्म करूं नये. पापाचरणी पुरुषाच्या चित्तास प्रायश्चित्त करूनही समाधान न वाटल्यास त्यानें मनास समाधान वाटे-पर्यंत त्या प्रायश्चित्ताची आवृत्ति करावी.

ब्राह्मणाचें ज्ञान हें तप आहे. क्षत्रियाचें रक्षण हें तप आहे. वैश्याचें पशुपालनादि वार्ता हें तप आहे. शूद्राचें ब्राह्मण-परिचर्या हेंच तप आहे. वाणी, मन व शरीर यांच्या नियमांनीं युक्त असलेले व फल, मूळ आणि वायू भक्षण करणारे ऋषि तपाच्या योगानेंच चराचरांसह त्रैलोक्यास प्रत्यक्ष पहातात. औषधें, आरोग्य, वैदिक व लौकिक विद्या आणि नानाप्रकारची दैवी स्थिति हीं सर्व तपाच्या योगानेंच प्राप्त होतात. कारण तप हेंच त्यांच्या प्राप्तीचें निमित्त आहे. जें दुस्तर, दुष्प्राप्य, दुर्गम व दुष्कर असतें तें सर्व तपाच्या योगानें साध्य होतें. कारण तप ही फार मोठी वर्धन-शक्ति आहे.

## शुभाशुभ कर्मफल

मन, वाणी व देह यांच्यापासून निर्माण होणारें विहित व निषिद्धरूप कर्म सुख-दुःखरूप फल देतें. जन्मांतरीं प्राप्त होणाऱ्या मनुष्यांच्या उत्तम, मध्यम व अधम गति कर्मजन्यच असतात.

अन्यायानें दुसऱ्याचें धन मिळविण्याविषयीं चिंतन, ब्राह्मणादिकांच्या वधाचा विचार करणें व परलोक नाहीं, देह हाच आत्मा आहे, असा आग्रह धरणें असें हें तीन प्रकारचें अशुभ फल देणारें मानसकर्म आहे.

अप्रिय भाषण करणें, असत्य भाषण करणें, परदोष त्याच्यामागें कथन करणें व ज्याच्याशीं आपला संबंध नाहीं त्याच्याविषयीं निरर्थक ( कुटाळकी ) बोलणें हें चार

प्रकारचें अशुभफलदायक वाचिक कर्म आहे. पण याच्या उलट ह्मणजे प्रिय भाषण, सत्य भाषण, पर-गुण-कथन व श्रुतिपुराणांतील राजकथा वर्णन हें शुभफलदायी वाचिक कर्म होय.

अन्यायानें दुसऱ्याची वस्तु घेणें, हिंसा करणें, परस्त्री-गमन, हें अशुभफलदायक शरीरकर्म होय.

प्राणी मनानें जें शुभ वा अशुभ कर्म करतो त्याचें फल मनानेंच भोगतो. तसेंच वाणीनें केलेल्या पापपुण्याचें फल वाणीच्या द्वारां भोगतो व शरीरानें केलेल्या शुभाशुभ कर्माचें फल शरीराच्या द्वारां भोगतो.

अधिकाधिक धनाची स्पृहा ( इच्छा ), अति निद्रा, दीनता, असंतोष, क्रूरता, आचाराचा लोप, याचना करण्याचें शील व धर्मादिकांचे ठायीं लक्ष न ठेवणें हीं तामस गुणाचीं लक्षणें आहेत.

जें कर्म केलें असतां, करीत असतां किंवा पुढें करावयाचें असतां कर्त्यास लाज वाटते, तें सर्व तामस गुणाचें कर्म होय.

---



# याज्ञवल्क्य-स्मृति.

## स्मृतिकार.

मनु, अत्रि, विष्णु, हारीत, याज्ञवल्क्य, उशनः, अंगिरः, यम, आपस्तंब, संवर्त, कात्यायन, बृहस्पति, पराशर, व्यास, शंख, लिखित, दक्ष, गौतम, शातातप, वसिष्ठ, प्रचेता, बुध, देवल, सोम, जमदग्नि, विश्वामित्र, प्रजापति, नारद, पैठीनसि, पितामह, बौधायन, छागलेय, जाबाली, च्यवन, मरीचि व कश्यप. ( एकंदर ३६. )

## धर्म

वेद, धर्मशास्त्रें, शिष्टांचा ज्याच्याविषयीं विकल्प असेल अशा धर्मानुष्ठानांत आपणास जें प्रिय वाटेल तें, उत्तम संकल्पापासून उत्पन्न झालेला, व शास्त्राच्या विरुद्ध नसलेला काम ( इच्छा ) अशीं पांच धर्माचीं प्रमाणें आहेत. यांच्यामध्यें परस्परविरोध उत्पन्न झाला असतां त्यांतील पूर्व पूर्व प्रमाण बलवान् जाणावें.

## विवाह

ज्याच्या ब्रह्मचर्याचें स्खलन झालें नसेल त्यानें बाह्य व आंतरलक्षणांनीं युक्त, वाग्दानानें किंवा उपभोगाच्या द्वारा पूर्वीं दुसऱ्या कोणाची न झालेली, वराच्या मनास आनंद देणारी, असपिंड आणि वयानें व अंगादि प्रमाणानें लहान अशा स्त्रीशीं आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें विवाह करावा.

ज्या विवाहांत वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या वरास बोलावून आपल्या शक्तीप्रमाणें वस्त्रें व भूषणें यांनीं अलंकृत केलेली कन्या कन्यादानविधीनें दिली जाते तो **ब्राह्म** विवाह होय.

यज्ञ करणाऱ्या ऋत्विजास दक्षिणा ह्मणून यथाशक्ति अलंकृत केलेली कन्या देणें हा **आर्ष** विवाह होय.

'तुह्मीं दोघें मिळून धर्माचरण करा.' असें ह्मणून कन्येची इच्छा करणाऱ्या वरास यथाशक्ति अलंकृत करून कन्या देणें हा **प्राजापत्य** विवाह होय.

वरापासून आपल्याकरितां किंवा कन्येकरितां द्रव्य घेऊन कन्या देणें हा **आसुर** विवाह.

कन्या व पुरुष यांच्या आपसांतील 'तूं माझी स्त्री' व 'तूं माझा पति' अशा प्रतिज्ञेनें दानादि विधिवांचून होणारा जो विवाह तो **गांधर्व** विवाह.

युद्ध करून कन्येच्या आप्तांस किंवा राजांस जिंकून कन्येस नेणें हा **राक्षस** विवाह.

कन्या निजलेली असतां किंवा सावध नसतांनां कपटानें तिचा अपहार किंवा स्वीकार करणें हा **पैशाच** विवाह.

## स्त्री

ज्या दिवशीं रजोदर्शन होतें त्या दिवसापासून सोळा दिवस स्त्रियांचा गर्भधारण करण्यास योग्य काल असतो. या काळासच ऋतु असें ह्मणतात. या सोळा रात्रींतील ६, ८, १०, १२, १४ व १६ या समरात्रीं स्त्रीसमागम

करावा. बाकी सर्व निषिद्ध रात्री वर्ज्य कराव्या. दिवसाहि स्त्रीसंग करूं नये, शिवाय अमावास्या, पौर्णिमा, अष्टमी, चतुर्दशी हीं पर्वें व पहिल्या ४ रात्री यांस वर्ज्य करावें. हे नियम पाळणारा गृहस्थ ब्रह्मचारीच होय.

पति, भ्राता, पिता, आप्त, सासु, श्वशुर, दीर व इतर बंधु यांनीं यथाशक्ति भूषणें, वस्त्रें व अन्न यांच्या योगानें स्त्रियांचा सत्कार करावा. कारण त्या प्रसन्न झाल्या असतां धर्म, अर्थ व काम यांची उत्तम प्रकारें वृद्धि करितात.

जी पतीचें प्रिय व हित करण्यांत तत्पर व उत्तम आचारसंपन्न असते आणि जिनें सर्व इंद्रियें आपल्या आधीन ठेविलीं आहेत अशा स्त्रीस या लोकीं उत्तम कीर्ति व परलोकीं उत्तम गति प्राप्त होते.

वृद्ध, डोक्यावर, पाठीवर किंवा खांद्यावर भार घेतलेला, अभिषिक्त राजा, ११० व्या श्लोकांत सांगितलेला त्रिविध स्नातक, स्त्री, रोगी, विवाहास जाणारा वर व गाडींतून येणारा, यांस मार्ग द्यावा. वृद्धादि इतरांस राजा मान्य आहे व राजास स्नातक मान्य होय.

## भक्ष्याभक्ष्य.

सत्कारयोग्य पुरुषास अवज्ञेनें दिलेलें; देवादिकांस अर्पण न केलेलें; केवळ आपल्या उदरंभरणार्थ तयार केलेलें; मांस, केंस, किडे यांनीं युक्त असलेलें; दह्यावांचून स्वतः आंबट नसून दुसरा पदार्थ आंत पडल्यानें किंवा कांहीं काळ राहिल्यानें आंबलेले पदार्थ खाऊं नयेत. शिळें; खाऊन झाल्यावर पानांत राहिलेलें, कुत्रा, कावळा वगैरेनीं स्पर्श

केलेलें; पतितादिकानीं पाहिलेलें; विटाळशी, चांडाळ इत्यादिकांनीं स्पर्शिलेलें; कोणास खावयास हवें असेल तर हें घ्यारे बाबानों, असें ओरडून दिलेलें; एक दिवस एकाचें, दुसऱ्या दिवशीं दुसऱ्याचें अशा रीतीनें मिळणारें; गाईनें वास घेतलेलें; कावळा वगैरेचें उष्टें आणि बुद्धिपूर्वक पाय लावलेलें अन्न अभक्ष्य होय.

लोभी, बद्ध, चोर, नपुंसक, मल्ल वगैरे रंगस्थानीं जाणारे, पापी, वैद्यवृत्तीवर निर्वाह करणारा, महारोगी (वात, अश्मरी, कुष्ठ, मेह, उदर, भगंदर व मूळव्याध हे ८ महारोग. ) रागावलेला, व्यभिचारिणी स्त्री, विद्याधनादिकानें गर्विष्ठ झालेला, शत्रु. क्रूर, उग्र, व्रात्य, दांभिक, स्वतंत्र स्त्री, सोनार, स्त्रीबुद्धीचा, ग्रामोपाध्याय, शस्त्रें विकणारा, लोहार, सुतार इ. कारागीर, शिंपी, सेवावृत्ति असणारा, कृतघ्न, प्राण्यास मारून त्यांवर उपजीविका करणारा, परीट, कलाल, ज्या घरांत स्वभार्येचा जार आहे, खोटें बोलणारा, तेली, रंगारी, गाडीवान् भाट, यांचें अन्न अभोज्य होय.

दासीच्या उदरीं जन्मलेला, गाई राखणारा, कुलमित्र, शेतीच्या उत्पन्नाचा भागीदार, व गृहकर्म करणारा किंवा 'मीं तुमचाच आहें' असें ह्मणून आत्मनिवेदन करणारा इतके हे शुद्रांतील भोज्यान्न आहेत.

जिच्यामधील पाणी सुकून गेलें आहे, ज्या ठिकाणीं लोक उन्हाच्या वेळीं येऊन बसतात अशा छायेंत, रस्त्यावर, गाईच्या गोठ्यांत, पाण्यांत व राखेंत; सूर्य, गाय, चंद्र,

संध्यासमय, जळ, स्त्री व ब्राह्मण यांच्यासमोर किंवा यांच्याकडे पाहत; मूत्र-पुरिषोत्सर्ग करूं नये.

थुंकी, रक्त, विष्ठा, मूत्र व रेत हीं पाण्यांत टाकूं नयेत; अग्नीपुढें पाय शेकूं नयेत, अग्नीचें उल्लंघनहि करूं नये.

( देश, ग्राम, कुलाचार आरोग्य व आयुष्य यांस ) विरुद्ध कर्म, प्रेताचा धूर, नदींतून पोहून जाणें हीं वर्ज करावींत. केंस, राख, भूस, अग्नि व खापऱ्या यांच्यावर बसूं किंवा उभें राहूं नये.

बहुश्रुत ब्राह्मण, सर्प व क्षत्रिय यांचा आणि त्याचप्रमाणें आपलाच आपण अपमान करूं नये. ( मला धिःकार असो, माझा जन्म व्यर्थ होय; यापेक्षां मीं मेलों असतों तर बरें झालें असतें इ. प्रकारें आपला अपमान करूं नये. )

उष्टें अन्न ( व पाणी, पत्रावळी इत्यादि ) विष्ठा, मूत्र व पाय धुतलेलें जळ हीं घरापासून दूर अंतरावर टाकावींत.

शरीर, मन व वाणी यांच्यायोगें जो धर्म करावयाच्या तो मोठ्या प्रयत्नानें ( आदरानें ) करावा.

प्रथम मातेच्या उदरांतून जन्म होतो व मौंजीबंधनामुळें दुसरा जन्म होतो. यास्तव ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांस द्विज ह्मटलें आहे.

## व्यभिचारिणी स्त्री.

जी व्यभिचार करिते तिचे दान, धर्म, इत्यादिसंबंधीं सर्व अधिकार काढून घ्यावे; न्हाणें, धुणें, उत्तम वस्त्र नेसणें इत्यादि करूं देऊं नयेत. तर तिचें शरीर व वस्त्रादि मळीन राहील असें करावें. तिचे प्राण मात्र राहतील इतकें

हलकें अन्न द्यावें. तिचा ज्यानें त्यानें धिक्कार करावा. तिला भूमीवरच कांहीं तरी टाकून निजावयास लावावें व अशा व्यवस्थेनें ठेवावें कीं, तिला कृतकर्माचा पश्चात्ताप व्हावा.

पति जीवंत असतां किंवा तो मेल्यावर जी स्त्री चंचळ होऊन अन्य पुरुषाशीं समागम करीत नाहीं तिची इहलोकीं कीर्ति होते व परलोकीं पुण्यप्रभावामुळें ती उमेसह क्रीडा करिते.

## कारणावांचून अन्य स्त्री करणें.

आज्ञेप्रमाणें वागणारी, गृहकृत्यांत हयगय न करणारी, पुत्रवति व प्रिय भाषण करणारी अशा स्त्रीचा त्याग करणाऱ्या पुरुषास राजानें त्याच्या धनाचा तिसरा भाग दंड करावा.

## स्त्रीनें गृहकृत्यांत कसें असावें ?

तिनें गृहांतील उपकरणें अर्थात् भांडीं, वस्त्रें, शय्या, पाट इत्यादि जागच्याजागीं व्यवस्थित ठेवावीं; गृहकृत्यांत दक्ष असावें, सदां हंसतमुख रहावें, वाईट तोंड करून राहूं नये, व फार खर्च करण्याचें शील ठेवूं नये. सासू, सासरा व वडील माणसें यांचें तिनें नित्य पादवंदन करावें. आणि तिनें हें सर्व आपल्या पतीच्या आधीन राहून करावें.

कुमारी कन्येचें रक्षण पित्यानें करावें, विवाहानंतर तिचें रक्षण पतीनें करावें. वृद्धपणीं तिचें रक्षण पुत्रानें करावें. पण पिता, पति, इत्यादिकांतील कोणीच नसल्यास तिच्या ज्ञातीच्या आप्तांनीं तिचें रक्षण करावें. आणि असेही नसल्यास राजानें तिचें रक्षण करावें. सारांश. स्त्री ही स्वातंत्र्यास मुळींच योग्य नाहीं. येथें रक्षण दुष्कर्मापासून समजावें.

---

# अत्रिस्मृति.

एकदां भगवान् अत्रिऋषींचे आश्रमांत पुष्कळ मोठ-मोठे ऋषी आपल्या शंकांचें समाधान करून घेण्याच्या इच्छेनें आले. अत्रिऋषि महान् तपस्वी, सदैव अग्निहोत्र चालविणारे, वेदार्थवेत्ते व सकल शास्त्रज्ञ असल्यामुळें, सर्व ऋषिमंडळांत त्यांना मोठा मान असे. आश्रमांत आलेल्या त्या ऋषींचा यथोचित आदरसत्कार केल्यावर, येण्याचें कारण त्यास विचारिलें असतां ऋषि ह्मणाले, ' भगवान्, आपण महान् ज्ञाते दूरदर्शी व सर्वज्ञ अहांत. ह्मणून आह्मी विचारतों कीं, सर्व मनुष्याचें कल्याण काय केलें असतां होईल? " असा प्रश्न ऐकून अत्रिऋषि ह्मणाले, ऋषिहो, आपण श्रुतिस्मृतींचा अभिप्राय उत्तम प्रकारें जाणतच अहां. तथापि माझ्या सामर्थ्याप्रमाणें मी आपल्या प्रश्नाचें उत्तर देतों. जें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे किंवा ऐकिलें आहे, तेंच आपणास सांगतों.

आपल्या शिष्याला एकहि अक्षर—केवळ ' ओम् '—सांगितलें तरी, त्यानें आपलें सर्वस्व ( विद्याधन ) त्याला अर्पण केल्याप्रमाणें होतें. या ऋणांतून मुक्त होण्याला गुरूला देतां येईल अशी एकहि वस्तु त्याच्याजवळ नाहीं. जो शिष्य, आपल्यास एक अक्षरहि शिकविणाऱ्यांस ' गुरु ' समजत नाहीं तो शंभर जन्म श्वानयोनींत जन्मतो. इतकेंच काय परंतु ज्यानें आपल्यास वेदशास्त्रादि शिकविलें त्या गुरूचा जो शिष्य अपमान करितो, तो पशुयोनींत जन्म

पावतो. आणि मरणानंतर एकवीस प्रकारचे नरक त्याला भोगावे लागतात.

कोणत्याही स्थळीं, कोणत्याही स्थितींत, कोणत्याही तऱ्हेनें मनुष्य रहात असला तरी त्यानें आपलें ( मनुष्य ) कर्तव्य काय तें ओळखून तदनुरूप वर्तन ठेविलें तर तो लोकप्रिय होतो, जगांत त्याची मानमान्यता रहाते.

## वर्णधर्म.

यज्ञ करणें, दान देणें, उपांगांसह वेद पठण करणें, आणि तप करणें हीं ब्राह्मणांचीं कर्में होत. आणि दान घेणें, वेद-शास्त्रें पढविणें आणि यज्ञादिक करविणें या ब्राह्मणांच्या तीन वृत्ति–जीवनापाय–होत.

यज्ञ करणें, दान देणें, सांगोपांग वेद पढणें आणि तप करणें हीं क्षत्रियांचीं कर्में होत. प्राण्यांचें रक्षण व शस्त्रें यांवर त्यानें उपजीविका करावी. दान देणें, सांगोपांग वेद पढणें, शेती करणें, गाईचें रक्षण करणें, व्यापार करणें, आणि यज्ञ करणें हीं वैश्यांचीं कर्में होत.

शेती करणें, गाईचें रक्षण करणें, व्यापार, कारागिरी, आणि ब्राह्मणादि तीन वर्णांची श्रद्धापूर्वक सेवा करणें हीं शूद्रांचीं कर्में होत.

आपापलीं कर्में केल्यानें चारी वर्ण इहलोकीं मानमान्यता व परलोकीं उत्तम गति पावतात; आणि आपलें कर्तव्य सोडून दुसऱ्या वर्णांचें कर्म करणाऱ्यांस शासन करणारा राजा स्वर्गलोकीं पूज्य होतो. स्वकर्माचरण करणारा शूद्र सुद्धां स्वर्गास जातो. परस्त्री रूपसंपन्न असली तरी ती जशी त्याज्य होय, तद्वत् दुसऱ्याचा धर्म त्याज्य समजावा.

स्वधर्म सोडून दुसऱ्याच्या धर्माचें आचरण करण्यांत वेळ घालविणारा शूद्र दंडास पात्र होतो.

दान घेणें, वेदशास्त्राचें पठण करविणें, निषिद्ध वस्तूंचा व्यापार करणें आणि यज्ञ करविणें, हीं कर्में केल्यानें क्षत्रिय व वैश्य पतित होतात असें सांगितलें आहे.

विद्वज्जनांचा योग्य आदर करणें ह्मणजे विद्येचा आदर करणेंच होय; अर्थात् विद्वानांचा अनादर हा विद्येचाच अनादर होय. वेदवेत्त्या व सकल शास्त्रज्ञ ब्राह्मणांचा ज्या देशांत सत्कार होतो त्या देशांत यथाकालीं पर्जन्य पडतो.

वेद, लोक, आश्रम आणि अग्नि यांचें रक्षण व्हावें ह्मणून सृष्टीचे आरंभीं ब्राह्मणांची उत्पत्ति केलेली आहे. प्रात:कालीं आणि सायंकाळीं मौन धारण करून एकाग्र-चित्तानें परमात्म्याचें ध्यान करणारे द्विज, हजार वर्षेंपर्यंत स्वर्गलोकीं राहून देवाकडून सत्कार पावतात. गुणदोषांची उत्तम प्रकारें परीक्षा करणारा राजा प्रतिष्ठा, स्वर्ग, राज्य आणि कोष हीं प्राप्त करून घेतो. दुर्जनांस दंड, सज्जनांचा सत्कार, न्यायानें कोषवृद्धि, याचकांविषयीं समता आणि स्वराज्याचें रक्षण, हे राजाचे पांच प्रकारचे यज्ञ होत.

वसा, रक्त, वीर्य, मज्जा, मूत्र, विष्टा, कानांतील मळ, नखें, कफ, हाडें, डोळ्यांतील पू आणि घाम हे मनुष्याचे मळ होत. वसाआदि सहा मळांची शुद्धि माती आणि पाणी यांनीं होते, आणि पुढील सहांची शुद्धि केवळ पाण्यानें होते.

शुचिर्भूत रहाणें, शुभ कर्में करणें, श्रम करणें, दुसऱ्याच्या गुणांस दोष न देणें, लोभाचा त्याग करणें, इंद्रिय-

निग्रह, दान देणें, आणि दुसऱ्यावर दया करणें हीं ब्राह्मणांचीं लक्षणें होत.

गुणीजनांच्या चांगल्या गुणांचा लोप करूं नये; इतकेंच नव्हे तर त्यांच्या दोषांची थट्टा करूं नये. याला **अनसूया** ह्मणतात.

निषिद्ध वस्तूंचा त्याग, सत्संगति आणि शुद्धाचरण याला **शौच** ह्मणतात. दुर्वर्तनाचा त्याग करून सदैव सदाचरणानें रहाणें याला **मंगल** ह्मणतात.

सदसद्वर्तनानें शरीरास पुष्कळ दुःख प्राप्त होणारीं कर्मे न करणें ह्याला **अनायास** ह्मणतात.

धर्मप्रमाणें वागून जें कांहीं धनादिक प्राप्त होईल त्यांत संतुष्ट असणें आणि परस्त्रीचा अभिलाष न करणें याला **अस्पृहा** ह्मणतात.

परपीडा सहन करून उलट पीडा न करणें याला **दम** ( इंद्रियनिग्रह ) ह्मणतात.

शक्त्यनुसार प्रसन्न मनानें दुसऱ्यास देणें याला **दान** ह्मणतात.

स्वजन, मित्र, द्वेष्य किंवा शत्रु यांसी समतेनें वागणें याला **दया** ह्मणतात.

जो द्विज गृहस्थाश्रमी असूनही वर सांगितल्याप्रमाणें वर्तन करतो तो मोक्ष पावतो.

ब्राह्मणानें इष्ट आणि पूर्त कर्में अवश्य करावीं. इष्ट कर्मांमुळे स्वर्ग व पूर्त कर्मांनीं मोक्ष प्राप्त होतो. अग्निहोत्र, तप, सत्य भाषण, वेदांचें रक्षण, अतिथिसत्कार आणि बलि,

वैश्वदेव हीं इष्ट कर्में होत; पाणपोई, विहिरी, तळाव, देवाळयें हीं बांधणें, अन्नदान करणें आणि बाग लावणें हीं पूर्त कर्में होत; ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या द्विजांनीं हीं दोन्हीं कर्में करणें हा त्यांचा सामान्य धर्म आहे. शूद्रानें पूर्त कर्में करावीं.

अक्रूरता, क्षमा, सत्य, अहिंसा, दान, नम्रता, प्रीति, प्रसन्नता, मधुर भाषण, शांत स्वभाव, या दहांना यम ह्मणतात. शौच, यज्ञ, तप, दान, वेदपठण, गुह्येंद्रियनिरोध, व्रत, मौन, उपवास आणि स्नान या दहांना नियम ह्मणतात. बुद्धिमानानें या दोहोंचें सेवन करणें अवश्य आहे, पुत्रहीन मनुष्यानें दत्तक पुत्र अवश्य घ्यावा. कारण हें कर्तव्य धर्मसंमत आहे. पुत्रमुख पाहिल्याबरोबर पिता पितृऋणांतून मुक्त होऊन, स्वर्गप्राप्तीस योग्य होतो. पुत्र आपल्या पित्याचें पुन्नाम नरकापासून रक्षण करितो.

## अभक्ष्य भक्षणास प्रायश्चित्त.

ब्राह्मणादिकांनीं न कळतां अभक्ष्य (खाण्यास अयोग्य असे पदार्थ) भक्षण केल्याची शंका येईल तर, मीठ, रुक्ष, अन्न, ब्राह्मी किंवा शंखपुष्पी यांचा रस दुधांत मिळवून तीन दिवसपर्यंत प्यावा. दारूच्या (ज्यांत दारू ठेविली होती अशा) भांड्यांतून चुकून पाणी प्यालें असतां पळस व बेलाचीं पानें, कुश, कमळ व औदुंबर यांचा काढा तीन दिवस प्याल्यानें तो शुद्ध होतो.

प्रात:काळीं व सायंकाळीं चुकीनें संध्या करावयाची राहिली तर स्नान करून एकाग्रचित्तानें एक हजार गायित्रीमंत्राचा जप करावा.

ज्यांना स्पर्श करणें ( शिवणें ) निषिद्ध मानिलें आहे, अशांचा स्पर्श झाला असतां केवळ स्नान केल्यानें शुद्धि होते. अशांचें उष्टें अन्नादिक खाण्यांत आलें तर सहा महिने-पर्यंत कृच्छ्रव्रत करावें ह्मणजे शुद्धि होते. राजानें किंवा अंत्यजादिकांनीं द्विजाला धर्मभ्रष्ट केलें तर त्याचे पुनः संस्कार करून त्यानें तीन दिवस कृच्छ्रव्रत करावें.

व्रतस्थ, शास्त्रानुसार पवित्र, अग्निहोत्री आणि राजा यांनीं अशौच धरण्याचें प्रयोजन नाहीं. ब्राह्मण दहा दिवसांनीं, क्षत्रिय बारा दिवसांनीं, वैश्य पंधरा दिवसांनीं, आणि शूद्र एक महिन्यानें अशौच मुक्त होतो. चौथ्या पिढीपर्यंत दहा दिवस, पांचवे पिढीस सहा दिवस, सहावे पिढीस तीन दिवस अशौच धरावें, दासी आणि अनुलोभ ( पतीपेक्षां हीन जातीची ) स्त्री यांनीं पति धरील त्याप्रमाणें अशौच धरावें. प्रत्यक्ष पति मृत्यु पावला तर आपल्या जातीप्रमाणें अशौच धरावें.

विवाह, उत्सव आणि यज्ञसमयीं अशौच येईल तर त्या त्या कृत्याकरितां ह्मणून ज्या वस्तूंचा संकल्प पूर्वी झाला असेल अशा वस्तू खाण्यांत किंवा घेण्यांत दोष लागत नाहीं. रोगी, कंजूष, कर्जबाजारी, कर्महीन, मूर्ख, स्त्रैण, जुगारी, पराधीन, आणि सदैव श्राद्धान्न भक्षण करणारा हे जन्म-पर्यंत सुतकी समजावे. वडील भाऊ जिवंत असतां त्याच्या विवाहापूर्वी ज्याचा विवाह होतो त्याला परिवित्ति ह्मणतात. अशानें दोषक्षालनार्थ दोन कृच्छ्रव्रतें करावी. कुबडा, खुजा, नपुंसक, बोबडा, वेडा, जन्मांध, बहिरा, पतित,

संन्यासी, दूरदेशीं रहाणारा, योगी आणि मतिहीन यांपैकीं एखादें व्यंग वडील भावांत असेल तर त्याच्या पूर्वी कहान भावानें लग्न केलें तर दोष नाहीं.

## प्रायश्चित्तविधि.

शुक्ल प्रतिपदेच्या दिवशीं एकदां केवळ एकच घांस भोजन करून द्वितीयेस दोन, तृतीयेस तीन याप्रमाणें पौर्णिमेपर्यंत चढवून, कृष्ण प्रतिपदेपासून एकेक घांस कमी करावा; अमावास्येस उपवास करावा. याला **चांद्रायणव्रत** ह्मणतात. तीन दिवस एकेक घांस खाऊन पुढें तीन दिवस उपवास करणें याला **अतिकृच्छ्र** ह्मणतात. हें व्रत वेदपाठक व लेखक, दुर्मळ, आणि नित्य पंचमहायज्ञ करणारांकरितां सांगितलें आहे.

गाईचें दूध, दहीं, मूत्र, तूप आणि शेण हीं पांच एकत्र केलीं ह्मणजे **पंचगव्य** होतें हें एक दिवस सेवन करून दुसरे दिवशीं उपवास करणें याला **सांतपनकृच्छ्र** ह्मणतात एक दिवस पंचगव्य व दुसरे दिवशीं कुशोदक या क्रमानें सहा दिवस सेवन करून सातवे दिवशीं उपवास करणें याला **महासांतपनकृच्छ्र** ह्मणतात. तीन दिवस सकाळीं व तीन दिवस सायंकाळीं भोजन करून, पुढें तीन दिवस याचना न करितां जें मिळेल तें खाणें, आणि पुढें तीन दिवस उपवास करणें, याला **प्राजापत्यव्रत** ह्मणतात. वरील व्रतांत सकाळीं पंधरा व सायंकाळीं बारा घांसांचें प्रमाण सांगितलें आहे. याचनेशिवाय मिळणाऱ्या चोवीस ग्रासांचें भोजन करणें याला **निराहारव्रत** ह्मटलें आहे.

तीन दिवस ऊन पाणी पिऊन पुढें तीन दिवस ऊन दूध, पुढें तीन दिवस ऊन तूप प्यावें. नंतर तीन दिवस केवळ वायुभक्षण करणें याला **तप्तकृच्छ्रव्रत** ह्मणतात. यांत पाणी चार पळें (१६ तोळे), दूध तीन पळें (१२ तोळे), आणि तूप एक पळ (४ तोळे), असें प्रमाण सांगितलें आहे. दहीं, तूप, दूध, हीं मानानें तीन तीन दिवस (दहीं आणि दूध १२।१२ तोळे व तूप चार तोळे) सेवन करून पुढें तीन दिवस वायु भक्षण करणें हें पवित्र **वैदिककृच्छ्रव्रत** होय. एक दिवस हविष्यान्न भोजन करून दुसरे दिवशीं याचनेवांचून जें मिळेल तें खाणें व तिसरे दिवशीं उपवास करणें याला **पादकृच्छ्रव्रत** ह्मटलें आहे. एकवीस दिवस केवळ दूध पिऊन रहाणें याला **कृच्छ्रातिकृच्छ्रव्रत** ह्मणतात. बारा दिवस उपवास करणें याला **पराकव्रत** ह्मटलें आहे. कपिला गाईचें धारोष्ण दूध पिणारा चांडाळही पवित्र होतो. ज्यांना अमुक प्रायश्चित करावें असें शास्त्रांत सांगितलें नसेल त्यांनीं चांद्रायणव्रत केलें पाहिजे असें समजावें.

## स्त्रीधर्म.

पति जिवंत असतां जी स्त्री उपवास व्रत धरते ती आपल्या पतीचें आयुष्य कमी होण्यास कारण होते. आणि स्वत: नरकाचें साधन करून ठेवितें असें समजावें. पतीचें पादोदक हेंच तिचें तीर्थ होय.

## ब्राह्मणांचीं लक्षणें.

वेदशास्त्रज्ञ ब्राह्मणाचें वचन मनुष्यांना पवित्र करितें. जप आणि होम करणारा ब्राह्मण अग्नीप्रमाणें तेजस्वी होतो.

पाण्यानें जसा अग्नीचा नाश होतो तद्वत् प्रतिग्रह घेणाऱ्या ब्राह्मणाचें तेज नष्ट होतें. परंतु आकाशांतील मेघपटलाचा वायू जसा नाश करितो तसा प्रतिग्रहजन्य दोषांचा नाश ब्राह्मण प्राणायामाचे योगानें करूं शकतो या लोकीं व परलोकींही वेदांची बरोबरी करणारें कांहीं नाहीं. मातेपेक्षां श्रेष्ठ गुरु नाहीं आणि दानासारखा मित्र नाहीं.

## संन्याशाचे धर्म

संन्याशानें संकटकालींही कांशाच्या भांड्यांतून अन्नोदक सेवन करूं नये. सोनें, तांबें, लोखंड, माती यांचीं पात्रेंही त्याज्य होत. संन्याशाला चूळ इत्यादि भरण्याकरितां त्याच्या हातावर पाणी घालावें, भिक्षा किंवा पाणी पात्रांतून देऊं नये, हें अन्न मेरूसमान व पाणी समुद्रासमान दिल्याचें फळ प्राप्त होतें असें सांगितलें आहे.

बृहस्पतिसारखा विद्वान्, लोकप्रसिद्ध असा संन्याशी असला तरी कुलीन ब्राह्मण इत्यादिकांचे घरीं त्यास निर्वाहापुरती भिक्ष्या न मिळेल तर त्यानें नीच जातीचे घरीं थोडथोडी भिक्षा मागावी; परंतु एकाचेच घरीं उदरपूर्ति करूं नये. आपत्कालावांचून एकच घरीं वास्तव्य करणारा संन्याशी, दहा दिवस वज्र नामक औषधींचें व नंतर तीन दिवस केवळ जल सेवन केल्यानें शुद्ध होतो.

## भिक्षुक कोणास ह्मणावें?

ब्रह्मचारी, संन्यासी, विद्यार्थी, मार्गक्रमण करणारा, भिक्षा मागून गुरूचें पोषण करणारा, आणि ज्याला निर्वाहाचें साधन नाहीं या सहांना भिक्षुक ह्मटलें आहे.

## प्रायश्चित्त.

रंगविल्याशिवाय वस्त्रें परिधान करणें, गंध लावणें, खणणें, सुगंधी द्रव्यें ( उटणीं, अत्तरें इत्यादि ) वापरणें, पतितांची संगति धरणें, हीं कर्में संन्याशाला पतित करितात; त्यांतून मुक्त होण्याला त्यानें तीन वर्षेपर्यंत कृच्छ्रव्रत केलें पाहिजे. स्त्रीहत्येच्या पातकाचें क्षालन तीन महिनेपर्यंत भूमिशयन व रात्रौ मात्र भोजन केलें असतां होतें. परीट, नट, बुरूड ( किंवा त्याच्यासारखे वेळूच्या टोपल्या वगैरे वळून पोट भरणारे ) यांचें अन्न द्विजानें सेवन केलें तर त्यानें चांद्रायणव्रत केलें पाहिजे. चांडालादि नीच जातींचें किंवा रजस्वला स्त्रीनें स्पर्श केलेलें अन्न, चुकून ब्राह्मणानें सेवन केलें तर त्यानें सहा दिवसपर्यंत प्राजापत्यव्रत करावें. ब्राह्मणादि चार वर्णांनीं चांडालादि नीचाचें अन्न सेवन केलें तर ब्राह्मणानें चांद्रायण, क्षत्रियानें सांतपन, वैश्यानें सहा दिवस पंचगव्य आणि क्षुद्रानें तीन दिवस व्रत करून यथाशक्ति दान द्यावें.

## गाईचें महत्व.

निदान एक तरी गाय प्रत्येक गृहस्थानें पाळून तिची यथायोग्य सेवा करणें हा त्याचा परम धर्म होय. ज्या घरीं वेदमंत्राचा उच्चार होत नाहीं, एकही गाय बाळगिलेली नाहीं, आणि जेथें मुलें नाहींत तें घर स्मशानवत् होय.

## मौन धारण.

लघुशंका, शौच, होम, दंतधावन, स्नान, भोजन आणि जप करतेवेळीं मौन धारण करावें. स्नान, दान,

जप, होम, भोजन, देवपूजा, वेदपठण, आणि पितृतर्पण हीं कारितांना पाय पसरूं नयेत.

## दान.

ग्रहण, विवाह, संक्रांति आणि प्रसवकाळ हीं रात्रीं प्राप्त झालीं तरी त्या वेळीं दान करावें. दुष्काळांत अन्नदान करणारा, सुकाळांत सुवर्ण दान देणारा आणि निर्जल स्थळीं पाणपोई घालणारा यांना स्वर्ग प्राप्त होतो. सर्व दानांत विद्यादान श्रेष्ठ होय. पण तें सुपात्रीं द्यावें. वेदवेत्ता, शास्त्रज्ञ, मातृपितृभक्त, ऋतुकाळीं स्त्रीगमन करणारा, सदाचरणी व सच्छिल अशा ब्राह्मणाला दान दिलें असतां दात्याचें कल्याण होतें.

---

# विष्णुस्मृति.

एकदां धर्मज्ञ अशा विष्णुऋषींनां, धर्मजिज्ञासु ऋषींनीं प्रश्न केला असतां ते ह्मणाले, चतुवर्णाचे सामान्य धर्म सांगतों ते श्रवण करा.

## गर्भाधानादि संस्कार.

गरोदर स्त्रीचा आठवे महिन्यांत—प्रत्येक खेपेस— सीमंत संस्कार करावा, हा संस्कार स्त्रीचा नसून गर्भस्थ बाळकाचा आहे. मूळ उपजल्याबरोबर जातकर्म संस्कार करावा. चौथे महिन्यांत बहिर्निष्क्रमणसंस्कार, सहा महिन्यांनीं अन्नप्राशन-संस्कार आणि तीन वर्षांनीं केशकर्मसंस्कार करावा.

## ब्रह्मचर्याश्रम.

गर्भापासून आठवे वर्षी ब्राह्मणांची, अकरावे वर्षी क्षत्रियांची आणि बारावे वर्षी वैश्यांची मुंज करावी. त्या समयीं गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें, वर्णोचित मेखलादि धारण करावीं. ब्राह्ममुहूर्तीं उठून, प्रातर्विधि आटोपून, स्नानानंतर तीन आचमनें आणि तीन प्राणायाम करून ब्रह्मचाऱ्यानें संध्या करावी. नंतर सूर्योदय होईपर्यंत गायत्रीमंत्राचा जप करावा. नंतर अग्निहोत्र करून गुरूला नमस्कार करावा. त्यांचा आशिर्वाद घेऊन ते सांगतील तें ( वेदशास्त्रादि ) पठण करावें; नंतर गुरूच्या आज्ञेनें द्विजगृहीं भिक्षा मागून ती गुरुला अर्पण करावी व त्यांच्याच आज्ञेनें भोजन करावें. सायंकाळीं एकशे आठ गायत्रीमंत्राचा जप करावा. आणि भोजनाची आवश्यकता असेल तर, दोनप्रहरांप्रमाणें भिक्षा मागून आणून भोजन करावें.

## गृहस्थाश्रम.

विद्यासंपादनानंतर गुर्वाज्ञेनें लग्न करून गृहस्थाश्रम स्वीकारावा. ब्राह्मणादि तीन वर्णांनीं नित्य प्रातःकाळीं उठून शौचमुखमार्जनादि आटोपून स्नान करावें; आळस करूं नये. संध्यावंदनानंतर यज्ञशाळेंत बसून अग्निहोत्र करून वेदपठण करावें. पंचमहायज्ञ केल्यावर भोजन करावें. सायंसंध्या घरीं किंवा बाहेर ( नदीतटाकीं वगैरे ) करून यथाशक्ति गायत्रीजप करावा. अग्निहोत्र केल्यावर भूतयज्ञ करून भोजन करावें. अतिथी केव्हांही येवो त्याचा आदरसत्कार

करावा. त्याचप्रमाणें भिक्षा मागणारा योगी आला असतांही त्याचा सत्कार करावा.

## वानप्रस्थाश्रम.

अरण्यांत राहून, वल्कलें ( वृक्षांच्या साली ) परिधान करावीं; जें आपोआप पिकणारें धान्यादिक अन्न ( मुन्यन्न ), मिळेल तें खावें. परंतु पूर्वाश्रमांतील पंचमहायज्ञ व अग्निहोत्र हीं त्याच धान्यादिकांनीं करावीं, त्यांचा त्याग करूं नये. शीतोष्णादि सहन करावीं. निष्कामबुद्धीनें चांद्रायणादिक व्रतें करावीं. अतिथींचा सत्कार करावा. स्वतः कधींही दान घेऊं नये. त्रिकाल स्नान करावें.

## संन्यासाश्रम.

संसारसुखाचा सर्व प्रकारें त्याग करून, ब्रह्मप्राप्तीकरितां चतुर्थाश्रम स्वीकारावा. आचार्यांच्या आज्ञेप्रमाणें दंडादिक आश्रमचिन्हें धारण करावीं. संन्याशानें गांवांत वास्तव्य करूं नये. गांवाबाहेर झाडाखालीं रहावें; छाटी, कौपीन व खडावा यांशिवाय काहीं वस्तू जवळ ठेवू नयेत. स्त्रियांशीं भाषण, स्पर्श, अवलोकन हीं वर्ज करावीं. नाच, गाणें, परसेवा, परनिंदा हीं सोडावीं. एकटेच फिरत असावें, मानापमान, राग, द्वेष हीं त्यजावीं. कृच्छ्रचांद्रायणादिक व्रतांनीं देह शुष्क करावा. न मागतां मिळेल त्यावर निर्वाह करावा. अन्नोदक सेवनाकरितां भांड्यांचा उपयोग न करितां तुंब्याचा किंवा केवळ हातांचा उपयोग करावा. केवळ संन्याशाचा वेष घेणाऱ्याला मोक्षप्राप्ति होत नाहीं.

विषयांचा त्याग करून, स्वात्मानुभवांत रममाण होणारा संन्यासी परम पदाची प्राप्ति करून घेतो.

( क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांचे धर्म काय त्यांचें विवेचन या पुस्तकांत अनेक स्थळीं आलें आहेच. )

---

# हारितस्मृति.

प्रथम प्रळयानंतर, जगदुत्पत्ति करणाऱ्या ब्रह्मदेवानें सुरासुरादिक प्रजा निर्माण केली. मनुष्यकोटींत मुख प्रधान ब्राह्मण, बाहु प्रधान क्षत्रिय, जंघा प्रधान वैश्य आणि चरण प्रधान शूद्र, हे चार वर्ण उत्पन्न केले.

## ब्राह्मणांचे धर्म.

वेदपठण, वेदाध्यापन, ( दुसऱ्यास वेद पढविणें ) यज्ञ करणें आणि दुसऱ्याकडून करविणें, सत्पात्रीं दान देणें आणि दान घेणें, हीं ब्राह्मणाचीं नित्य सहा कर्में होत. धर्माकरितां अथवा द्रव्य घेऊन, किंवा सेवा घेऊन, वेद पढवावे असें सांगितलें आहे. यांपैकीं एकही शुभ लक्षण ज्यांस नाहीं अशा शिष्याला वेद पढविणें वृथा होय. वेद आणि शास्त्र हे ब्राह्मणाचे दोन नेत्र होत. केवळ वेद किंवा शास्त्र जाणणारा ब्राह्मण एकाक्ष होय; व हीं दोन्हीं ज्याला येत नसतील तो आंधळा होय! बलिदान, अतिथि-सत्कार, गुरुसेवा, सत्य भाषण, अक्रोधत्व, सद्धर्माचरण इत्यादिकांविषयीं ब्राह्मणानें निरालस असावें. स्वधर्माचरण

करणारा ब्राह्मण उत्तम गति पावतो. व या लोकींही सदैव सुखी असतो.

## राजधर्म.

राजनीति आणि संधि-निग्रह करण्यांत चातुर्य हे गुण प्रजापालक राजाचे ठायीं असावे. धर्मानुकूल दान देणें, विद्वानांचा आदर करणें, स्वस्त्रीचे ठायीं मात्र अनुरक्त असणें, प्रजेपासून उत्पन्नाचा सहावा भागच कर ह्मणून घेणें, धर्मानें प्रजापालन करणें, वेदाध्ययन आणि यज्ञ करणें हीं क्षत्रिय राजाचीं कर्तव्यें होत.

## वैश्यधर्म.

गोरक्षण, शेती, व्यापार हीं वैश्याचीं कर्में होत. मोह, दंभ, असत्य भाषण, ईर्ष्या, परस्त्री हीं वैश्यानें सोडावीं. यज्ञ, वेदपठण, दान, पितृकार्य, ब्राह्मणांचा सत्कार हीं कर्में करणारा वैश्य, इहलोकीं सौख्य भोगून अंतीं स्वर्गास जातो.

## शूद्रधर्म.

तिन्ही वर्णांची श्रद्धापूर्वक सेवा करणें, दान देणें, आणि पाकयज्ञानें देवतांचें पूजन करणें इत्यादि शूद्राचीं कर्में होत.

## ब्रह्मचर्याश्रम.

गुरुगृहीं राहून गुरूची एकनिष्ठेनें सेवा करणें हा ब्रह्मचाऱ्याचा धर्म होय. त्यानें ब्रह्मचर्य पाळावें, भूमिशयन करावें, गुरुपासून विधिपूर्वक वेदवेदांगांचें पठण करावें, धर्मज्ञान प्राप्त करून घ्यावें. मृगाजिन, दंड, मेखला, हीं धारण करावीं. इंद्रियें जिंकावीं, भिक्षान्नावर निर्वाह करावा.

पादरक्षा, छत्री, सुगंधि पदार्थ, माळा, नाच, गाणें, बहुभाषण, हत्ती किंवा घोडा यांवर बसणें, मैथुन यांचा त्याग करावा. माता-पिता व गुरु यांची सेवा करावी. त्यांचे आज्ञेंत रहावें. जिव्हा, जननेंद्रिय, पोट, हात हीं इंद्रियें ज्यांच्या स्वाधीन झालीं आहेत-ज्याला वश करितां आलीं-अशा ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यानें ब्रह्मचर्याश्रमांत असतां, चतुर्थाश्रम घेण्याचा काळ ठरवावा, किंवा नैष्ठिक ब्रह्मचारी राहून आपलें सर्व आयुष्य गुरुसेवेंत घालवावें. गुरुनिधनानंतर त्याच्या पुत्राच्या किंवा शिष्याच्या सहवासांत राहून तपाचरण करावें. नैष्ठिक ब्रह्मचाऱ्यानें विवाह करूं नये अथवा संन्यास घेऊं नये.

## गृहस्थाश्रम

अध्ययन समाप्तीनंतर ब्रह्मचाऱ्यानें समावर्तन संस्कार करून कुलशीलानें योग्य व रूपवान् अशा कन्येशीं ब्राह्मविधीनें विवाह करावा. गृहस्थानें आळस सोडून प्रातःकाळीं उठून सूर्योदयापूर्वी दंतधावन करावें. दंतधावनाकरितां करंज, खैर, कंदब, मोळ, सप्तपदी, पृश्निपर्णी, जांभूळ, कडुनिंब, रुई, किंवा उंबर यांचें बारिक काष्ठ ( ओलें ) घ्यावें. ज्यांना कांटे आहेत असे वृक्ष बाभूळ इत्यादि-पवित्र होत. ज्यांतून दुधासारखा चीक निघतो अशा वृक्षांचें काष्ठ दंतधावनाकरितां घेणें यशवृद्धिकारक मानिलें आहे. दंतधावन काष्ठ ८ अंगुळें लांब असावें. अशीं काष्ठें न मिळतील तर मंजनादिकांचा उपयोग करावा.

दंतधावनानंतर स्नान करून संध्या करावी. आकाशांत नक्षत्रें दिसत असतांच तोंच संध्येस आरंभ करावा, सूर्योदय होईपर्यंत गायत्रीमंत्राचा जप करीत असावें. सूर्यास्तापूर्वींच सायंसंध्येस आरंभ करून अस्तानंतर नक्षत्रदर्शनापूर्वीं आटोपावी. नंतर हवन करावें. स्नानसंध्येनंतर देवयज्ञादिक यज्ञ करून, अतिथि प्राप्त झाला असतां त्याचा सत्कार करावा; नंतर भोजन करावें.

## वानप्रस्थाश्रम.

वृद्धापकाळ जवळ आला आहे असें पाहून, स्त्रीला पुत्राचे स्वाधीन करून अथवा तिची इच्छा असल्यास बरोबर घेऊन वानप्रस्थाश्रम स्वीकारावा. अरण्यांत राहून कंदमूळांवर निर्वाह करावा. रोज एकदां फळाहार करावा. शीतोष्ण सहन करावें, तपश्चर्या करावी. जो वानप्रस्थ आपलें मन जिंकून, योगसाधनादि करितो तो परमपदास जातो.

## संन्यासाश्रम.

वानप्रस्थाश्रमानंतर संन्यास स्वीकारावा. संन्याशानें स्त्रीपुत्रादिकांवर ममता करणें सोडून द्यावें. पुण्यक्षेत्रीं राहून आश्रमचिन्हें धारण करावीं. निर्वाहापुरतीच रोज भिक्षा मागावी. परब्रह्मचिंतनांत काळ घालवावा.

## योगाभ्यासविधि.

योगबळानें पापाचें क्षाळन होतें. योगानें एकांतांत बसून अंतर्बाह्य व्याप्त असलेल्या ब्रह्माचें ध्यान करावें. आत्मसुखाची प्राप्ति होईपर्यंत त्यानें ध्यान सोडूं नये. ज्याप्रमाणें

घोड्याशिवाय रथ व सारथ्यावांचून घोडा चालूं शकत नाहीं, त्याप्रमाणें तप आणि विद्या यांवांचून भवसमुद्र सुकर होत नाहीं. ज्ञानयुक्त असून तप करणारा योगी, देहबंधनापासून मुक्त होतो.

---

## औशनसस्मृति.

मूळच्या ब्राह्मणादि चार वर्णांत वर्णसंकर होऊन ज्या जाती निर्माण झाल्या, त्या संकरजाति होत. देशकालपरत्वें या संकरजातींतही अनेक भेद होऊन त्यांच्या धर्मकर्मांतही भिन्नता झाली त्यांचें वर्णन या स्मृतींत विशेषेंकरून केलें आहे.

---

## अंगिरःस्मृति.

या स्मृतींत नीळ उत्पन्न करणारे, तिजपासून रंग करणारे आणि निळ्या रंगाचीं वस्त्रें वापरणारे यांस दोषी म्हटलें आहे. निळीनें रंगविलेलें वस्त्र धारण करून, भोजन, दान, जपआदि कृत्यें केलीं असतां प्रायश्चित्त सांगितलें आहे.

रजक, चांभार, नट, बुरूड, कैवर्तक, मेद आणि भिल्ल या सातांस अंत्यज म्हटलें आहे. अशांनीं सिद्ध केलेलें अन्न, चुकून ब्राह्मणानें भक्षण केलें तर त्यानें चांद्रायण करावें; क्षत्रियानें कृच्छ्रव्रत आणि वैश्यानें अर्ध कृच्छ्रव्रत करावें; चुकूनहि द्विजानें अंत्यजाचें घरचें जल सेवन

केलें तर त्यानें प्रायश्चित्त घेतलें पाहिजे. अंत्यजाच्या विहिरीचें उदक ब्राह्मणानें सेवन केलें तर त्यानें सांतपन व्रत करावें. क्षत्रिय, वैश्य, शूद्र यांनीं अनुक्रमें पूर्ण, अर्ध व चतुर्थांश प्राजापत्य व्रत करावें. चुकून गाईला काठीनें मारिलें असतां ती बेशुद्ध होऊन पडेल तर आठ हजार गायत्रीजप करावा. सोनें आणि चांदी यांचीं भांडीं, सूर्य किंवा चंद्र-किरणानें शुद्ध होतात.

---

## यमस्मृति

या स्मृतींत विशेषेंकरून अनेक प्रकारचीं प्रायश्चित्त सांगितलीं आहेत, एखाद्या पापामुळें आपले बांधव पतित झाले असतील तर त्यांचा त्याग करावा. परंतु त्यांचा विनाकारण त्याग करणारास प्रजापालक राजानें दंड करावा. माता पतित झाली तरी तिचा त्याग करूं नये. आत्महत्येचा प्रयत्न करणाऱ्यास दोनशें रुपये व त्याच्या पुत्रादिकांस एक एक रुपया ( रौप्यमुद्रा ) दंड करून, सर्वांस प्रायश्चित्तही घ्यावयास लावावें. पाण्यांत बुडतां बुडतां वांचलेला, फांसीपासून सुटून जिवंत राहिलेला, संन्यास घेऊन आश्रमधर्माचा त्याग करणारा, विष पिऊन आत्मघात करीत असतां वांचलेला, उंचावरून उडी मारून आत्मघाताचा प्रयत्न करणारा, या सर्वांस प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्यानें तप्तकृच्छ्र किंवा चांद्रायण करणें, व त्यांच्याबरोबर अन्नोदकादि व्यवहार कर-

णारानें दोन चांद्रायणें करावीं किंवा गाय दान द्यावी. गाईचा गोठा किंवा ब्राह्मणाचें घर जाळणारा, जो स्वतः फांस लावून मेला आहे त्याला अग्निसंस्कार करणारा, आणि तो फांस कापणारा यांनीं कृच्छ्रव्रत केल्यानें ते शुद्ध होतात. चांडाळाच्या घरचें अन्न खाणारा अथवा चांडाळस्त्रीशीं समागम करणारा पतित होतो. त्यानें एक वर्षपर्यंत कृच्छ्रव्रत करावें. न समजून चांडाळाचें अन्न खाणारास दोन चांद्रायण व्रतें सांगितलीं आहेत. ब्रह्महत्यादिक महापापें करणारे अश्वमेधासारखीं महत्कृत्यें करून पुनित होतात. गाईला मारलें असतां तिचा गर्भपात होईल तर मारणारानें कृच्छ्रव्रत करावें. प्रायश्चित्त समयीं क्षौरही केलें पाहिजे.

तलाव, विहीरी, देवळें, आड यांचा जीर्णोद्धार करणारास, तीं नवीन बांधिल्याप्रमाणेंच पुण्यफळ मिळतें. पांढऱ्या गाईचें दहीं आणि मूत्र, काळ्या गाईचें शेण, तांबड्या गाईचें दूध, आणि कपिला गाईचें तूप, हीं पंचगव्याकरितां श्रेष्ठ होत.

---

# आपस्तंबस्मृति.

क्रोधा इतकें भयंकर शस्त्र नाहीं; तो सापापेक्षांही भयंकर विषारी आहे. आत्मकल्याण इच्छिणाऱ्यानें त्याचा त्याग अवश्य केला पाहिजे. क्षमा हा गुण इहपरसुखास कारण आहे. क्षमाशील मनुष्याला इतर लोक दुर्बळ म्हणतात पण तें खरें नाहीं, कारण क्षमेच्या बळानेंच त्याला महत्कार्यें

साधितां येतें. शब्दशास्त्री, गृहदारादिकांवर प्रेम करणारा, अथवा सान्या जगाला वश करून घेण्यांत गढलेला मोक्ष-पदास जात नाहीं. तर एकांतवास करणारा, व्रताचरणी, आणि संसारांत विशेष न गुरफटणारा मोक्षप्राप्ति करून घेतो. अध्यात्मविषयांचें चिंतन करण्यांत गुंतलेला, हिंसा न करणारा, आणि स्वाध्याय योग करणारा, मोक्षभागी होतो.

न भाजलेल्या मडक्यांत पाणी घातलें असतां जशी त्या मडक्याची व पाण्याची अवस्था होते, तद्वत् ज्यानें क्रोधाचा त्याग केला नाहीं त्याच्या जपयज्ञादिकांची व त्याची अवस्था होते. ह्मणजे क्रोधामुळें तें सर्व निष्फळ होतें. अपमानाचें दुःख सहन करणाऱ्याच्या तपाची वृद्धि होते. मानाच्या लालसेनें तपाचा क्षय होतो. ज्या ब्राह्म-णाला मानसन्मानाची आवड उत्पन्न होते त्याच्या हातून यज्ञतपादि शुभकर्में चांगल्या प्रकारें होत नाहींत. ब्राह्म-णानें मानाला भ्यावें व अपमानाची इच्छा करावी, असें मनु ह्मणतात.

परस्त्रीला मातेसमान, परद्रव्याला मृत्तिकेसमान आणि सर्व प्राण्यांनां आत्मसमान पहातो तोच खरोखर द्रष्टा होय.

---

## संवर्तस्मृति.

एकदां संवर्तऋषीच्या आश्रमास वामदेवादिक पुष्कळ श्रेष्ठ ऋषि प्राप्त झाले. त्यांनीं धर्मज्ञ अशा संवर्तऋषीस द्विजांचे धर्म विचारिले असतां. त्यांनीं जें सांगितलें तें या स्मृतींत आहे.

ज्या भूप्रदेशांत कृष्णमृग फिरत असेल तो प्रदेश धर्मसाधनास श्रेष्ठ होय.

## ब्रह्मचर्याश्रम.

ब्रह्मचाऱ्यानें गुरूचे आज्ञेंत असावें, एकाग्र मनानें वेदाध्ययन करावें. सकाळीं व सायंकाळीं भिक्षा मागून आणून, गुर्वाज्ञेनें पूर्वेकडे तोंड करून भोजन करावें. भोजनापूर्वीं आचमन करावें. आचमन करण्याचे पूर्वीं पाय धुवावे, शेंडीला गांठ मारावी, गळ्यांत यज्ञोपवित असावें आणि बसून आचमन करावें. गुढघ्यापर्यंत पाय व कोंपरापर्यंत हात धुवावे. नंतर द्वादश आंगांस स्पर्श करावा. संध्या व अग्निहोत्र न केलें तर दोष लागतो. त्याच्या नाशार्थ आठ हजार गायत्रीजप करावा. एकाच घरीं भिक्षा मागून खाणें ब्रह्मचाऱ्यास अनुचित होय. हा दोष त्याच्याकडून घडेल किंवा स्नान केल्याशिवाय भोजन करील, तर त्यानें आठशें गायत्रीजप करावा. ब्रह्मचाऱ्यानें शिळें अन्न खाऊं नये आणि प्रकृति चांगली असतां दिवसा निजूं नये.

## गृहस्थाश्रम.

समावर्तन संस्कारानंतर, आपल्या कुलास योग्य, रूपवती, सुलक्षणी अशी कन्या ब्राह्मविवाहानें वरून, गृहस्थाश्रम स्वीकारावा. गृहस्थानें नित्य पंचयज्ञ करावे. जननाशौच आणि मृताशौच असेल तेव्हां मात्र पंचयज्ञ करूं नयेत, असें सांगितलें आहे. या काळांत वेदपठण व दान

हीं कृत्येंही करूं नयेत. पुत्रजन्मानंतर पित्यानें सचैल-स्नान केलें ह्मणजे इतरांस स्पर्श करण्यास तो शुद्ध होतो. माता दहा दिवसांनीं शुद्ध होते. जननाशौच असतां तांदूळ किंवा फळें यांनीं होम करावा असें सांगितलें आहे.

## दानमहात्म्य.

जी वस्तू आपल्यास प्रीय असेल ती सत्पात्रीं दान द्यावी. द्रव्य, धान्य, अन्न, रत्न, सुगंधी पदार्थ, भूषणें इत्यादि-कांच्या दानानें, दात्याला जन्मोजन्मीं सौख्य प्राप्त होतें. वेदपाठक, कुलीन, अभ्यागत अशांना दान दिल्यानें उत्तम फळ मिळतें. सुशील, वेदवित्, कुलीन, शुद्ध, बुद्धिमान् अशा ब्राह्मणांस बोलावून त्यांचा आदर करून हव्य-कव्यान्नानें त्यांची तृप्ति करावी. अनेक रसभरित ( आंबे इत्यादि ) फळें, त्यांची आवड असलेल्या ब्राह्मणास दान करावीं; तेणेंकरून दात्याचें कल्याण होतें. वस्त्रदानानें उत्तम वेष प्राप्त होतो.

रौप्यदानानें चांगलें रूप प्राप्त होतें. सुवर्णदानानें कोषवृद्धि होते. अभयदानानें सर्व इच्छा पूर्ण होतात व दीर्घायुष्य प्राप्त होतें. अन्न, जल आणि तूप हीं दान दिलीं असतां सौख्य प्राप्त होतें. पादत्राण ( खडावा इत्यादि ) छत्र, पलंग, घोडा आणि आसन यांच्या दानानें दात्यास विपुल धन प्राप्त होतें. शीतकाळांत शीतनिवारणार्थ इंधन ( लांकडें ), ऊर्णावस्त्र ( शाल इत्यादि ) इत्यादिकांचें दान दिल्यानें जठराग्नि प्रदीप्त रहातो व मोठें भाग्य प्राप्त होतें.

रोग्यांना औषधें वगैरेचें दान दिल्यानें, दीर्घायुष्य व आरोग्य प्राप्त होतें. सालंकृत कन्यादानानें कल्याण होतें व कीर्ति आणि मानमान्यता प्राप्त होते.

अन्नदान सर्वांत श्रेष्ठ सांगितलें आहे; कारण अन्नापासूनच प्राण्यांची उत्पत्ति व वृद्धि होते. विद्यादानानें सुख आणि मोक्ष प्राप्त होतो. दात्यानें दातृत्वाची बढाई सांगूं नये. गुप्तदानाचें महात्म्य फार मोठें आहे.

## महा पातकांस प्रायश्चित्त.

ब्रह्महत्या करणारा, मदिरापान करणारा, सोनें चोरणारा, गुरुतल्पग. (गुरूचे शय्येवर गमन करणारा) आणि यांस सहाय्य करणारा, या पांचांस महापातकी ह्मटलें आहे.

ब्रह्महत्या करणारानें घरादाराचा त्याग करून अरण्यवास करावा, तेथें वल्कलें नेसून कंदमूळावर किंवा भिक्षेवर उपजीविका करावी. हत्येचें चिन्ह धारण करावें. जटा वाढवाव्या. पापाचा उच्चार करीत असावें. याप्रमाणें बारा वर्षें वनवास केल्यावर ब्रह्महत्येच्या पातकापासून तो मुक्त होतो.

मदिरापान द्विजांस अगदीं वर्ज्य आहे. मद्यपी द्विजानें गाईचें मूत्र, शेण किंवा तूप अशीं कढत कढत प्यावीं; वनवास करावा; किंवा तीन चांद्रायणें करावीं.

सुवर्ण चोरणारानें आपला अपराध आपण होऊन राजास सांगावा. राजानें त्याला योग्य शिक्षा द्यावी, अथवा त्यानें वनवास पत्करून ब्रह्महत्या करणाराप्रमाणें वागावें. गुरुतल्पगानें तप्त कढईंत निजून देहत्याग करावा अथवा चार किंवा तीन चांद्रायणें करावीं.

वर सांगितलेल्या पातक्यांबरोबर मोहवश होऊन संबंध ठेवणाऱ्यानें त्यांच्याप्रमाणेंच प्रायश्चित्त केलें पाहिजे.

## गोहत्या प्रायश्चित्त.

गोवध करणारानें गाईच्या गोठ्यांत १५ दिवस रहावें. इंद्रियें स्वाधीन ठेवून त्रिकालस्नान, सत्तू, दूध, दही, शेण यांचें क्रमानें सेवन करावें. भूमिशयन करावें, गायत्री जप करावा. नंतर ब्राह्मणभोजन आणि गोदान करावें.

## अन्य हत्या प्रायश्चित्त.

हत्ती, घोडा, उंट हैस व वानर यांची हत्या चुकून घडली तर सात दिवस निराहार रहावें.

वाघ, कुत्रा, गर्दभ, सिंह, अस्वल, आणि डुकर यांची हत्या चुकून करणारानें तीन दिवस उपोषण करावें.

अरण्यसंचारी हरिणाचा वध करणारानें एक दिवस ( अहोरात्र ) अग्निदेवतेची आराधना उम्यानें करावी.

हंस, कावळा, बगळा, मोर, कारंडव, सारस यांस मारणारानें तीन दिवस उपवास करावा.

चिमणी, मैना, पोपट, तित्तिर, श्येन, गिधाड, पारवा, खबूतर, टिटवी, जाळपाद, कोकिळा व कोंबडा यांची हत्या करणारास एक दिवस उपवास करावा असें सांगितलें आहे.

बेडूक, साप, मांजर आणि उंदीर मारणारानें तीन दिवस उपवास करून दान द्यावें. ज्यांना हाडें नाहींत अशा जिवांची हत्या घडली तर प्राणायामानें शुद्धि होते.

ज्याच्या घरीं यज्ञ करणें निषिद्ध मानलें आहे अशाच्या घरीं यज्ञ करविणारानें आठ हजार गायत्री जप करावा म्हणजे तो शुद्ध होतो.

---

# कात्यायनस्मृति.

## यज्ञोपवित.

कापसाचें सूत विधियुक्त काढून तिहेरी करावें आणि पुन्हा तें तिहेरी करून गांठ मारावी. तें प्रत्येक द्विजानें सदैव धारण करावें. यज्ञोपवित गळ्यांत नसतां व शेंडी मोकळी असतां केलेलें पुण्यकर्म निष्फळ होतें.

## आचमनाविधि.

प्रत्येक कृत्याच्या आरंभीं तीन आचमनें करून, दोनदां तोंड पुसून तोंड, नाक, डोळे, कान, नाभी, हृदय, शिर आणि स्कंध यांस स्पर्श करावा. मधलीं तीन बोटें (उजव्या हाताचीं) एकत्र करून मुख आणि प्रदेशिनीनें नाक यांस स्पर्श करावा; आंगठा आणि अनामिका यांनीं प्रथम उजवा व नंतर डावा डोळा व कान यांस स्पर्श करावा. करांगुळी आणि आंगठा यांनीं नाभी व तळहातानें हृदय यांस स्पर्श करावा. सर्व बोटांनीं शिर व स्कंध यांस स्पर्श करावा. अमुक कर्म अमुक हातानें करावें असें जेथें स्पष्ट सांगितलें नसेल तेथें तें कर्म उजव्या हातानें करावें. दिशेचा स्पष्ट उल्लेख नसेल तर पूर्व, उत्तर किंवा ईशान्य यांपैकीं एका दिशेकडे मुख करून कर्म करावें. अमुक कर्म उभ्यानें अथवा बसून करावें असा स्पष्ट उल्लेख नसेल तेव्हां तें कर्म बसून करावें.

## अरणी.

शमीगर्भ, पिंपळाचें पूर्व किंवा उत्तरेकडील कांकूड घेऊन त्याची अधरारणी व उत्तरारणी तयार करावी. टणक कांकडाचें चात्र आणि ओविली हीं तयार करावीं. अरणी-पासून उत्पन्न केलेला अग्नि पवित्र मानिला आहे. चोवीस अंगुळें लांब, सहा अंगुळें रुंद आणि चार अंगुळें जाड दोन्हीं अरणी असाव्या. आठ अंगुळें प्रमंथ, बारा अंगुळें चात्र व ओविली घेऊन, अग्नि उत्पन्न करावा.

## पंचमहायज्ञ.

ब्रह्मयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, आणि मनुष्ययज्ञ हे पंचमहायज्ञ विधिपूर्वक वेदाध्ययन आणि अध्यापन, संध्यो-पासना आणि योगाभ्यास इत्यादि करणें यास ब्रह्मयज्ञ ह्मणतात.

हवन विद्वत्समागम, पवित्राचरण, दिव्य गुणांचें धारण इत्यादि शुभकर्म करणें, हा देवयज्ञ होय.

सिद्ध केलेलें अन्न प्राणिमात्रांस देणें याला भूतयज्ञ ह्मणतात.

विद्वान्, ऋषि, माता, पिता गुरुआदि वृद्ध जन, ज्ञान आणि योगी यांची सेवा करणें हा पितृयज्ञ होय. (पितृयज्ञाचे दोन भेद आहेत; श्राद्ध आणि तर्पण; श्रद्धापूर्वक केलेलें कर्म तें श्राद्ध होय. आणि ज्यापासून माता पिता आदिपितर प्रसन्न होतात तें तर्पण होय.) पूर्वनिश्चयाशिवाय (आमंत्रण दिलें नसतां) आलेल्या अतिथीचा भोजनादिकांनीं सत्कार करणें याला मनुष्ययज्ञ ह्मणतात. तर्पणापूर्वीं व प्रातःकालचे हवनानंतर ब्रह्मयज्ञ करावा. स्वतःस उपवास असला तरी दोन्ही वेळां बलिवैश्वदेव करावा.

---

# बृहस्पतिस्मृति.

सुरश्रेष्ठ इंद्रानें शतक्रतु केले. प्रत्येक यज्ञांत त्यानें ब्राह्मणांना अनेक दानें दिलीं. त्या इंद्रानें सुरगुरु महाज्ञानी बृहस्पतींना प्रश्न केला—हे गुरुवर्य, ज्यामुळें सर्व प्रकारें सौख्यप्राप्ति होईल असें श्रेष्ठ दान कोणतें? इंद्राचा हा प्रश्न ऐकून बृहस्पति म्हणाले:—सर्व दानांत सुवर्ण, भूमि आणि गाय यांचें दान श्रेष्ठ होय; भूमीदानानें सुवर्ण, रौप्य, वस्त्र, रत्नें यांचें दान दिल्याचें फळ प्राप्त होतें.

नांगरून पेरून तयार केलेल्या भूमीचें दान सर्व सुखें प्राप्त करून देतें. पाण्यांत पडलेला तैलबिंदु जसा पसरतो, तद्वत् जींत पीक पेरलें आहे अशी भूमि दान दिल्यानें, त्या पिकाच्या वाढीबरोबर दानाचें फळ वृद्धिंगत होत जातें.

अन्नदान देणारा सदैव सुखी होतो. आणि वस्त्रदानानें उत्तम रूप प्राप्त होतें. गोदान, भूमिदान, आणि विद्यादान यांचें महात्म्य फार मोठें आहे. भूमिदान करणाराचे पितर संतुष्ट होतात. या दानानें दात्याची सर्व पापांपासून मुक्तता होते.

## भूमिहरण निषेध.

अन्यायानें दुसऱ्याची जमीन घेणारा किंवा घेवविणारा हे दोघेही आपल्या कुळाच्या नाशास कारण होतात. अन्यायानें भूमिहरण करविणारा पशुयोनीप्रत जातो.

होम, दान, तप, वेदाध्ययन व इतर पुण्यकर्में हीं अन्यायानें अर्धे अंगुळही जमीन घेतल्यानें, नाश पावतात.

गाईचा रस्ता, गांवांतली गल्ली, स्मशान आणि रक्षण केलेलें शेत यांची हद्द तोडणारास नरकप्राप्ती होते.

कुलीन, सदाचारसंपन्न, वेदवेत्ता, तपस्वी, समदृष्टि अशा ब्राह्मणाला दिलेलें दान अक्षय्य पुण्यफल प्राप्त करून देतें. सुवर्ण, गाय, पृथ्वी, वस्त्र, अन्न, तीळ इत्यादिकांचें दान मूर्खानें घेतलें असतां, कच्च्या मडक्यांत ठेविलेल्या पाण्याप्रमाणें त्याची दशा होते. जमीन, गाय, स्त्री यांचें हरण करणारास ब्रह्महत्येचें पाप लागतें. त्याला शासन न करणाऱ्या राजासही तेंच पाप लागतें. विवाह, दान आणि यज्ञ यांत विघ्न उत्पन्न करणाऱ्या मूर्खाला कीटकजन्म प्राप्त होतो.

दानानें धनवृद्धि होते आणि प्राण्यांचें रक्षण केलें असतां दीर्घायुष्य प्राप्त होतें. हिंसा न करणारास रूप, आरोग्य आणि ऐश्वर्य हीं प्राप्त होतात.

---

# पाराशर-स्मृति.

जगद्विख्यातपरम पावन अशा हिमालय पर्वतावर देवदार वृक्षांच्या दाट छायेखालीं एकांतांत बसून ब्रह्मचिंतन करणाऱ्या श्रीव्यासमुनीजवळ, एकदां पुष्कळ थोर थोर ऋषि, धर्मशास्त्र जाणण्याच्या इच्छेनें प्राप्त झाले. त्यांनीं व्यासांस प्रश्न केला. हे सर्वज्ञ, कलियुगांत मनुष्याला श्रेयस्कर असा धर्म व आचार कोणता, तें कृपा करून सांगावें.

ऋषींचा प्रश्न ऐकून संतुष्टचित्त झालेले व्यास ह्मणाले, धर्मजिज्ञासु ऋषिश्रेष्ठहो, माझे परमश्रेष्ठ जनक पराशर ऋषि माझ्यापेक्षां तुमच्या प्रश्नाचें उत्तर चांगल्या प्रकारें देतील; ह्मणून आपण सर्व मिळून त्यांच्याकडे जाऊं. हें ऐकून त्या ऋषींस परमानंद झाला व ते श्रीव्यासांबरोबर बदरिकाश्रमीं पराशर ऋषींकडे गेले. पराशरांनीं सर्वांचा यथोचित सत्कार केल्यावर व्यास ऋषींनीं हात जोडून पराशरांची स्तुति करून आपल्या आगमनाचें कारण कळविलें. तें ऐकून पराशर ह्मणाले:—वेदांचा उत्पन्नकर्ता कोणी नाहीं ह्मणजे ते अपौरुषेय आहेत. युगानुरूप धर्मांतहि न्यूनताधिक्य होतें. सत्ययुगांत तप, त्रेतायुगांत ज्ञान, द्वापरयुगांत यज्ञ, आणि कलियुगांत दान हीं मुख्य मानितात. तप, ज्ञान, यज्ञ आणि दान हे धर्माचे चार पाय मानिले आहेत.

सत्ययुगांत मनु, त्रेतायुगांत गौतम, द्वापरयुगांत शंख आणि लिखित व कलियुगांत पराशर यांनीं सांगितलेले जे धर्म त्याप्रमाणें लोक विशेषेंकरून वागतात. सत्ययुगांत धर्मविरोधी, देशांचा त्रेतायुगांत अशा गांवांचा, द्वापरयुगांत अशा कुलांचा आणि कलियुगांत धर्मविरोधी मनुष्यांचा त्याग करावा असें सांगितलें आहे.

सत्ययुगांत अधर्मी मनुष्याजवळ भाषण केलें असतां त्रेतायुगांत त्याच्या दर्शनानें, द्वापारयुगांत त्याचें अन्न सेवन केल्यानें व कलियुगांत स्वतः अधर्म केल्यानें पतित होतो.

कृतयुगांत धर्मज्ञ ब्राह्मणाकडे जाऊन, त्रेतायुगांत अशा ब्राह्मणाला आपल्या घरीं बोलावून, द्वापरयुगांत याचना करणारास व कलियुगांत सेवा करणारास लोक दान देतात.

सत्पात्र ब्राह्मणाकडे जाऊन दान देणें हें सर्वोत्तम होय; आपल्याकडे बोलावून दान देणें उत्तम. मागितल्यावर देणें मध्यम, आणि सेवा घेऊन देणें हें अधम दान होय. कलियुगांत अधर्मानें धर्म, असत्यानें सत्य, चोरांकडून राजा, आणि स्त्रियांकडून पुरुष जिंकिले जातात. अग्निहोत्रें बंद होतात. गुरुजनांची पूजा होत नाहीं व कौमार्यावस्थेंतच स्त्रियांना संतति होते!!!

## सदाचार.

चारही वर्णांनीं सदाचारानें वागावें. जो सदाचाराचा त्याग करितो त्याचा धर्महि त्याग करितो. नित्य षट्कर्में करणारे, देव आणि अतिथींचें पूजन करणारे, आणि हवन करून भोजन करणारे ब्राह्मण सदैव सुखानें रहातात. स्नानानंतर संध्या, जप, हवन, वेदपठण, देवपूजा, अतिथींचा सत्कार आणि वैश्वदेव हीं कर्में नित्य केलीं पाहिजेत. मित्र असो अथवा शत्रु असो, मूर्ख असो अथवा विद्वान् असो, वैश्वदेवसमयीं जो अतिथी येईल त्याचा उत्तम प्रकारें सत्कार केल्यानें इच्छित मनोरथ पूर्ण होतात.

आपल्याच गांवांत रहाणारा, परिचयाचा किंवा वैश्वदेव समयापूर्वीं आलेला अतिथि नव्हे. जो एकाएकीं प्राप्त झाला तो अतिथि होय. अतिथींचा सत्कार करून त्याला अन्नोदक, मिष्ट भाषण इत्यादिकांनीं संतुष्ट करावें.

ज्या घराहून अतिथि निराश होऊन परत जातो त्या घरीं विद्वानांना येणें मान्य नसतें. आणि त्यानें केलेलीं यज्ञयागादिक कर्में व्यर्थ होतात. चांगली जमीन पाहून बीज

पेरावें, आणि सत्पात्र पाहून दान द्यावें, कारण हीं कधीं नष्ट होत नाहींत. वैश्वदेवसमयीं जर आपल्या घरीं भिक्षुक आला तर वैश्वदेवाकरितां निराळें अन्न काढून ठेवून अगोदर त्याला भिक्षा घालावी. संन्यासी आणि ब्रह्मचारी यांना भिक्षा अवश्य दिली पाहिजे. चुकून वैश्वदेव करणें राहिला तर जो दोष लागतो तो संन्यासी आणि ब्रह्मचारी यांना भिक्षा घातली असतां नाश पावतो, पण त्यांना विन्मुख दवाडिलें तर लागणारा दोष वैश्वदेवानें नष्ट होत नाहीं.

जो नित्य वैश्वदेव करितो परंतु अतिथीचा सत्कार करीत नाहीं तो कावळ्याच्या योनीस जातो. डोक्यास पागोटें घालून, दक्षिण दिशेकडे तोंड करून आणि डाव्या पायावर हात ठेवून भोजन करूं नये. संन्याशाला सोनें, ब्रह्मचाऱ्यास पान आणि चोराला अभय देणारा नरकास जातो. चोर असो, चांडाळ असो किंवा आपला शत्रू असो तो वैश्वदेवसमयीं आपल्या घरीं आला असतां त्याचा सत्कार केल्यानें पुण्य प्राप्त होतें.

हातांत शस्त्र घेऊन, शत्रूचा नाश करून धर्माप्रमाणें राजानें प्रजेचें पालन करावें; ज्याप्रमाणें वृक्षांचें संगोपन करून त्यांचीं फुलें तेवढींच माळी तोडून घेतो त्याप्रमाणें राजानें प्रजेचें संरक्षण करून तिजपासून कररूपानें धनादि पदार्थ घ्यावे; परंतु कोळसेविक्याप्रमाणें मुळासुद्धां वृक्ष उपटून जाळूं नये. ह्मणजे प्रजेला पिळून काढूं नये.

व्यापार, गोरक्षण, रत्नादिकांची परीक्षा करणें, आणि

शेती करणें हीं वैश्याचीं कर्में होत. द्विजांची सेवा करणें हा शूद्राचा धर्म होय.

मीठ, तेल, मध, दहीं, दूध इत्यादि गोरस हीं शुद्रस्पर्शानें दूषित होत नाहींत; तीं शूद्रापासून सर्वांनीं घ्यावीं. मद्य-मांसाचा, व्यापार अभक्ष्यभक्षण, आणि अगम्य स्त्रीगमन हीं कर्में शूद्रास पतित करितात.

## कृषिकर्म.

षट्कर्में करणाऱ्या ब्राह्मणानें शेती केली तरी चिंता नाहीं. थकलेले, तहानेलेले, उपाशी, लंगडे अशा बैलांना शेतीचे कामीं लावूं नये. मीठ आदिकरून सहा रस ब्राह्मणानें विकूं नयेत. झाडें तोडण्यामुळें, जमीन खणल्यामुळें आणि शेतीचें काम करितांना जी क्षुद्र जीवांची हत्या घडते तिच्या पापाचें निरसन यज्ञ केल्यानें होतें. शेतीच्या उत्पन्नाचा सहावा भाग राजाला, एकविसावा भाग देवकार्याला आणि तिसावा भाग परोपकाराकडे जो खर्च करितो त्यास कृषिकर्म-दोष लागत नाहीं. क्षत्रियानेंही शेती करावी. वैश्य आणि शूद्र यांनीं शेती, व्यापार, आणि कारागिरी करावी. परंतु शूद्रांचा परमधर्म द्विजांची सेवा करणें हाच होय.

## जनन-मरणाशौच.

जननाशौच ब्राह्मणानें दहा दिवस, क्षत्रियानें बारा दिवस, वैश्यानें पंधरा दिवस आणि शूद्रानें एक महिना धरावें. बकरी, गाय, म्हैस, प्रथम बाळंत झालेली ब्राह्मणी आणि नवीन जल हीं दहा दिसांनीं शुद्ध होतात.

एकाच आईबापापासून झालेले ( सहोदर ) वेगळे रहात असले तरी त्या सर्वांना अशौच सारखेंच धरिलें पाहिजे.

दोन्ही अशौचांत दान देणें व घेणें, हवन आणि ब्रह्मयज्ञ हीं करूं नयेत. सुतक्याचें अन्न कोणी खाऊं नये. चवथे पिढीपर्यंत दहा दिवस, पांचवे पिढीपर्यंत सहा दिवस, सहावे पिढीस चार दिवस आणि सातवे पिढीस तीन दिवस अशौच धरावें.

शिंगांच्या पशूंकडून मरण आलें तर, अथवा जळून मरेल तर, किंवा लहान बालक असेल तर, दूर देशांत मरेल तर, आणि आपल्या कुळांतील पुरुष संन्यास घेऊन मरेल तर, त्याच वेळीं शुद्धि होते. त्याचें अशौच धरण्याचें कारण नाहीं.

परदेशांत स्वकुळांतील कोणी मृत झाला असतां, त्याला दहा दिवस झाल्यावर तें वर्तमान कळेल तर तत्काळ सचैल-स्नानानें शुद्ध होतो. दीड महिन्यानंतर समजेल तर तीन दिवस, सहा महिन्यांनीं समजेल तर एक रात्र व एक दिवस अशौच धरावें; आणि एक वर्षानें समजेल तर तत्काळ स्नानानें शुद्ध होतो. दूर देशांत अकाळीं मरणाराची मृत्यु-तिथि ठाऊक नसेल तर कृष्णपक्षांतील अष्टमी, एकादशी अमावास्या या तिथींस स्नानादिकें करून शुद्धि होते. दांत येण्यापूर्वीं मरणाऱ्या बालकास—अग्निदाह करूं नये आणि त्याचें अशौचही धरूनये. जिवंत मूल उपजलें तर चार पिढ्यांपर्यंत जननाशौच धरावें; मृत उपजलें तर केवळ मातेनें अशौच धरावें. मृतसंतान रात्रीं झालें तर त्या दिवसा-

पासून दिवस मोजावे. दांत येण्यापूर्वी मेलेल्या मुलाचें अशौच स्नानानें जातें. चौलकर्म झालें नसेल तर एकदिवसरात्र व मुंजीपूर्वी तीन दिवस अशौच धरावें. मूल जिवंत उपजून मेलें तर दहा दिवस अशौच धरावें.

ज्या घरांत नित्य हवन करणारा ब्रह्मचारी रहात असेल तो मेला असतां त्याच्या प्रेताला स्पर्श करणारांनीं मात्र अशौच धरावें. जो आपल्या गोत्रांतील किंवा कुटुंबांतील नसेल, त्याच्या प्रेतयात्रेस स्मशानांत जाणारा ब्राह्मण स्नानानें शुद्ध होतो.

## स्त्रीपुरुष धर्म.

जी पतित नाहीं अशा स्त्रीचा भरतारुण्यांत त्याग करणारा सात जन्म स्त्री होऊन वैधव्यदुःख भोगतो.

रोगी, अशक्त किंवा मूर्ख असा नवरा असतां जी स्त्री त्याचा त्याग करिते ती सर्पिण होते. पतीच्या अनुमोदनाशिवाय स्त्रियांनीं केलेलें व्रत, पतीचें आयुष्य कमी करितें; ब्रह्महत्येच्या पापापेक्षां गर्भपाताचें पाप द्विगुण आहे. अशा स्त्रीचा नवऱ्यानें त्याग करावा. त्यामुळें अग्निहोत्रादि श्रौतस्मार्तकर्मांचा लोप झाला तरी चालेल. अशा स्त्रीसह अग्निहोत्र करणारा चांडाल होय.

## विद्वत्सभा.

वेदवेत्ते आणि अग्निहोत्री असे चार किंवा तीन ब्राह्मण एकत्र झाले असतां तिला धर्मसभा ह्मणावें. अग्निहोत्री नसतील परंतु वेदवेदांगांचें तथ्य चांगल्या प्रकारें जाणणाऱ्या तीन किंवा पांच ब्राह्मणांचीही धर्मपारिषद होते.

मौन धारण करणारा, परिमित बोलणारा, तपस्वी, मुनि, आत्मज्ञानी, यज्ञ करविणारा आणि ज्यानें योग्य रीतीनें ब्रह्मचर्याश्रमानंतर समावर्तन केलें असेल, अशा एका विद्वानाचीही धर्मसभा होते. हे गुण ज्यांचे आंगीं नाहींत असे हजार नांवाचे ब्राह्मण एकत्र झाले तरी ती धर्मसभा नव्हे. काष्ठाचा हत्ती किंवा चामड्याची हरिण ज्याप्रमाणें खऱ्या हत्तीची किंवा हरिणीची योग्यता पावणार नाहींत त्याप्रमाणें अविद्वान् ब्राह्मण केवळ नांवाचे ब्राह्मण होत. निर्जन गांव, जलरहित कूप हीं जशीं व्यर्थ तद्वत् मूर्ख ब्राह्मण समजावा.

चार वेद जाणणारे चार ब्राह्मण, एक नैयायिक ( न्याय जाणणारा ), एक वेदांगें जाणणारा, एक धर्मशास्त्रज्ञ, एक ब्रह्मचारी, एक गृहस्थ आणि एक वानप्रस्थ, यांच्या सभेला धर्मसभा असें ह्मणतात. या धर्मसभेनें राजाज्ञा घेऊन, प्रायश्चित्तादिक धर्मकर्मांची व्यवस्था करावी. साधारण प्रायश्चित्त असेल तर राजाज्ञेवांचूनही या सभेनें आपलें कर्तव्य करावें.

समजून अथवा नकळतां धर्माचें उल्लंघन ज्याच्या हातून घडलें असेल त्यानें धर्मसभेंत जाऊन, आपल्या अपराधाचें प्रायश्चित्त विचारावें; आणि धर्मज्ञ सांगतील त्याप्रमाणें प्रायश्चित्त घ्यावें.

धर्माचें मर्म न जाणणाऱ्या ब्राह्मणांनीं एखाद्याला भलतेंच प्रायश्चित्त सांगितलें तरी, पापी शुद्ध होईल; परंतु त्या अज्ञानी सांगणाऱ्यास तें पाप शंभरपट होऊन लागतें. दगडावर पडलेलें पाणी ज्याप्रमाणें सूर्याच्या प्रखर किरणांनीं सुकून जातें, त्याप्रमाणें विद्वानांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्तानें

पापाची निवृत्ति होते. वांझ गायीप्रमाणें विद्याहीन ब्राह्मण निरुपयोगी होय. विद्वानांच्या संमतीवांचून प्रायश्चित्त सांगणारा राजा पापी होतो. देवमंदीर किंवा तशाच प्रसिद्ध ठिकाणीं प्रायश्चित्त करवावें. प्रायश्चित्त घेणारानें मुंडण करून स्नान करावें. रात्रीं गाईच्या गोठ्यांत निजावें आणि दिवसा गाई चरावयास जातील तेव्हां त्यांच्यामागें रानांत फिरत रहावें. गाईचें आणि ब्राह्मणाचें रक्षण करणारा सर्व पापांपासून मुक्त होतो. प्रायचित्त्यानें जोडा आणि छत्री घेऊं नये. नदीवर स्नान करावें, आणि उदरनिर्वाहा करितां गांवांत भिक्षा मागतांना आपल्या पापाचा स्पष्ट उच्चार करावा.

## भक्ष्याभक्ष्य विचार.

व्यालेल्या गाईचें दूध दहा दिवसपर्यंत सेवन करूं नये. त्याचप्रमाणें लसूण, गाजर, कांदा, वांगें, गोंद, उंटिणीचें दूध हीं सेवन करणारानें तीन उपवास करून पंचगव्य घेतलें असतां शुद्ध होतो.

जो क्षत्रिय आणि वैश्य अंतर्बाह्य वर्तनानें शुद्ध असेल त्याच्या घरीं देवपितृकार्यसमयीं ब्राह्मणानें भोजन करावें. तूप, दूध, तेल आणि गूळ यांचे पदार्थ, पवित्र आचरणाच्या शुद्राचेंहि घरीं ब्राह्मणानें सेवन करावे.

---

# व्यासस्मृति.

श्रीवेदव्यासाकडे एकदां पुष्कळ धर्मजिज्ञासु ऋषि प्राप्त झाले असतां व्यासांनीं सांगितलेलें वेदार्थगर्भित धर्मशास्त्र या स्मृतींत वर्णिलें आहे.

श्रुति, स्मृति आणि पुराण यांत एखादे गोष्टीसंबंधीं विरोध दिसून येईल तर त्या ठिकाणीं वेदवचन प्रमाण मानावें. स्मृति आणि पुराण यांत विरोध आल्यास स्मृति-प्रमाणें मानावें. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांस द्विज ह्मणतात. द्विजांसच श्रुति, स्मृति आणि पुराणोक्त धर्माप्रमाणें यथायोग्य धर्माचार पाळितां येतात.

## सोळा संस्कार.

१ गर्भाधान २ पुंसवन ३ सीमंत ४ जातकर्म ५ नामकरण ६ निष्क्रमण ७ अन्नप्राशन ८ मुंडण ९ कर्णवेध १० यज्ञोपवित ११ वेदारंभ १२ केशांत १३ समावर्तन १४ विवाह १५ आवसथ्याधान आणि १६ श्रौताग्निस्थापन. याप्रमाणें सोळा संस्कार आहेत, पहिले नऊ संस्कार पुत्राचे समंत्रक व कन्येचे तंत्रोक्त होतात. हे नऊ व विवाह, शूद्रांचे वेदमंत्राशिवाय होतात. पहिल्या गर्भस्थापनेच्या समयीं गर्भाधान संस्कार होतो. तीन महिन्याचा गर्भ झाल्यावर पुंसवन संस्कार होतो. आठव्या महिन्यांत सीमंतोन्नयन संस्कार करावा. मूल उपजल्यावर जातकर्म, अकरावे दिवशीं नामकरण, चवथे महिन्यांत निष्क्रमण, सहावे महिन्यांत अन्नप्राशन आणि कुळाचार असेल त्याप्रमाणें मुंडण, कर्णवेध, हे संस्कार करावे. गर्भापासून आठवे वर्षीं ब्राह्मण, अकरावे वर्षीं क्षत्रिय, आणि बारावे वर्षीं वैश्य यांचा यज्ञोपवित संस्कार करावा. तिन्ही वर्णांचा यज्ञोपवित संस्कार करण्याचा काळ निघून जाऊन दुप्पट वर्षें होतील तर त्या बाळकांचा व्रात्यस्तोम नामक संस्कार केला पाहिजे. द्विजांचे दोन जन्म मानिले आहेत. मातेपासून

## ब्रह्मचाऱ्याचे धर्म.

यज्ञोपवित संस्कार झाल्यावर द्विजानें गुरुगृहीं जावून रहावें; त्यानें दंड, कौपिन, यज्ञोपवित, मृगाजिन आणि मेखळा, हीं आश्रमचिन्हें धारण करावीं दिनशुद्धि पाहून गुरूच्या आज्ञेनें वेदाभ्यासाला आरंभ करावा. गुरूचे आज्ञेंत रहावें. दुसऱ्याचा द्रोह, चहाडी, हिंसा, गाणें, वाजविणें, नाचणें; उन्माद, भांडण, अलंकार धारण, अंजन, उटणें, आरशांत पहाणें, पुष्पमाळा धारण, चंदनादिकांची उटी, स्त्रियांकडे पहाणें, त्यांच्याबरोबर बोलणें किंवा त्यांना स्पर्श करणें, स्त्रियांचें स्मरण करणें, भटकणें, हीं ब्रह्मचाऱ्यानें कधींही करूं नयेत. दोनप्रहरीं सदाचारी द्विजांचे घरीं जाऊन भिक्षा मागून आणावी. गुर्वाज्ञेनें भोजन करावें. भिक्षासमयीं अन्नाशिवाय धनादि पदार्थ कोणी आग्रहपूर्वक दिले तरी ते घेऊं नयेत. आणि कोणी भोजनास बोलाविलें तर गुरूच्या आज्ञेशिवाय त्याच्याकडे भोजन करूं नये. नित्य विधिपूर्वक अग्निहोत्रादि कर्मे करून गुरूची सेवा करावी. मधुर बोलावें आणि दुसऱ्याचें हित होईल अशा गोष्टी सांगाव्या. अभ्यासांत आळस करूं नये.

विधिपूर्वक वेदाध्ययन करणारा ब्रह्मचारी, दूध, तूप, मध आणि अमृत यांनीं देवतांना प्रसन्नच करीत असतो असें समजावें. अनध्यायावांचून वेदाभ्यासांत खंड पडूं देऊं नये. आणि अनध्यायाचे दिवशीं वेदांगांचें पठण करावें. आश्रमधर्माचें उल्लंघन केलें असतां अभ्यास चांगला होत नाहीं ह्मणून अहंकार सोडून नियमाचें पालन करावें. मरेपर्यंत ब्रह्मचर्याश्रमांत रहाणारास नैष्ठिक ब्रह्मचारी ह्मणतात;

त्याला ब्रह्मसायुज्याची प्राप्ति होते. केशांतसंस्कारपर्यंत नियम पाळून, एक किंवा दोन, तीन वेदांचें अध्ययन झाल्यावर गुर्वाज्ञेनें समावर्तन संस्कार करून परोपकाराचे इच्छेनें गृहस्थाश्रम स्वीकारावा.

## गृहस्थाचे धर्म.

गृहस्थाश्रम स्वीकारणारानें, स्वज्ञातीची, निरोगी, आपल्या आईबापांच्या गोत्रांतली नव्हे अशी, सुलक्षणी, पूर्वी जिचा विवाह झाला नसेल अशी, कुलीन, सुंदर, उपवर अशी कन्या पाहून, तिच्याबरोबर, ब्राह्म किंवा दैवविधीनें विवाह करावा. बाप, आजा, भाऊ, चुलता, कुटुंबांतील श्रेष्ठ, आणि माता यांनीं योग्य वर पाहून कन्येचा विवाह करावा. यांपैकीं जिला कोणी नसेल तिनें, स्वतःच योग्य वराची निवड करावी.

'मी ही कन्या तुम्हांस देतों, आणि मी हिचा स्वीकार करितों, याप्रमाणें कन्या देणारा आणि तिचें ग्रहण करणारा, हे उभयतां विवाहसमयीं अशी प्रतिज्ञा करून ती पूर्ण न करतील तर राजदंडास पात्र होतात. जी कन्या दूषित नाहीं तिचा त्याग करणारा व निर्दोष कन्येला वृथा दूषण लावणारा हे दोघेही राजदंडास पात्र समजावे.

धर्म, अर्थ, आणि काम हे स्त्रीपासून साधतात. म्हणून विवाह अवश्य करून संतानोत्पत्ति करावी. विवाह करून गृहस्थानें अग्नि आणि स्त्री, यांसह घरदार करून रहावें. एकमतानें श्रद्धा आणि विधिपूर्वक गृहस्थाश्रमास उक्त अशीं कर्मे करीत असावें. स्त्रियांनां तिन्ही अर्थांची प्राप्ति पतिसेवेनें मात्र होते.

स्त्रीनें, पति निजून उठण्यापूर्वीं उठावें. झाडून सारवून घर स्वच्छ करावें. अग्निहोत्रास लागणारीं भांडीं धुवून, ताजें पाणी भरून जेथल्या तेथें ठेवावीं. स्वयंपाकाचीं भांडीं स्वच्छ करून स्वयंपाकघरांत ठेवावीं. आपल्या सासुसासऱ्यांनीं किंवा आई, बाप, भाऊ, इत्यादिकांनीं दिलेले अलंकार व वस्त्रें धारण करावीं. मन, वाणी आणि कर्म यांनीं शुद्ध, पतीचे आज्ञेंत वागणारी, केवळ पतीची छायाच अशी होऊन पतीचें हित करावें. पतीनें सांगितलेलें काम मन लावून करावें; अनेक रुचकर अन्नें तयार करून, ज्या अन्नानें देवयज्ञ, भूतयज्ञ आणि पितृयज्ञ झाला असेल तें अन्न अतिथिसह पतीस वाढावें. नवऱ्याचें जेवण झाल्यावर त्याची आज्ञा घेऊन स्वतः भोजन करावें. भोजनोत्तर संसारास झालेला जमाखर्च लिहून ठेवावा. याप्रमाणें पतिव्रता स्त्रीनें उत्तम प्रकारें संसार चालवावा. स्त्रीनें नागवें असूं नये; मोठ्यानें ओरडून बोलूं नये; वाचाळपणा करूं नये, पतीला अप्रिय असलेले शब्द उच्चारूं नयेत. कोणाबरोबर भांडण करूं नये. बेताबातानें खर्च करावा; धर्म आणि अर्थ हे साधावे.

संसारकृत्यांत असावधानता, उन्माद, क्रोध, ईर्षा, दुसऱ्यास फसविणें, मानाची इच्छा, चहाडी, हिंसा, वैर, अहंकार, धूर्तता, नास्तिकपणा, अविचार, चोरी आणि ढोंग, या गोष्टी साध्वी स्त्रीनें करूं नयेत. पति हेंच परम दैवत मानून त्याची एकनिष्ठपणें सेवा करणारी साध्वी स्त्री या लोकीं यश आणि सौख्य पावून परलोकींहि अत्यंत सौख्य भोगिते.

धूर्त, धर्म आणि काम नष्ट करणारी, जिला पुत्रसंतति होत नाहीं, असाध्य रोगानें पीडित, दुष्ट स्वभावाची, दुर्व्यसनी, पतीचें हित न करणारी, अशी स्त्री जिवंत असतांही पतीनें दुसरी स्त्री करावी. पहिली स्त्री जिवंत असतां दुसरें लग्न केलें तरी दुसरीप्रमाणेंच पहिलीसही अन्नावस्त्रादिक दिलें पाहिजे.

पति परदेशांत गेला असतां साध्वी स्त्रीनें, अभ्यंगादिक वर्ज्य करावीं. प्राणरक्षणापुरतें अन्न खावें. सर्व अवस्थांमध्यें स्त्रियांचें रक्षण पुरुषांकडून होतें. बालपणीं पिता, लग्नानंतर पति, आणि वृद्धावस्थेंत पुत्र यांनीं रक्षण केलें पाहिजे.

## गृहस्थाश्रमाची थोरवी.

ब्रह्मचर्यादि आश्रम स्वीकारून जें पुण्यफळ प्राप्त व्हावयाचें तें एका गृहस्थाश्रमातच प्राप्त करून घेतां येतें. जो मनुष्य शास्त्राज्ञेनुसार गृहस्थाश्रम चालवितो त्याला घरबसल्या सर्व तीर्थें केल्याचें फळ मिळतें. गुरुभक्त, स्त्रीपुत्रादिक व सेवकाचें पालन करणारा, दयाशील, सरळ मनाचा, जपहोमादिक कृत्यें नियमितपणें करणारा, सत्यवक्ता, जितेंद्रिय अशा गृहस्थास सर्व तीर्थें केल्याचें फळ प्राप्त होतें. जो परधन आणि परस्त्री यांची इच्छा करितो, त्यानें सर्व तीर्थें केलीं तरी तीं निष्फळ होत. नम्र, विद्वानांची सेवा करणारा, ब्राह्मणांस संतुष्ट करणारा, बलि—वैश्वदेव करणारा, भिक्षुकास भिक्षा घालणारा, अशा गृहस्थास पातक लागत नाहीं.

## दानमहात्म्य.

ज्याचा स्वतः उपभोग घेतला, किंवा जें सत्कार्यीं लाविलें तेंच आपलें धन होय; पुष्कळ द्रव्य जवळ असून तें केवळ रक्षण करून ठेवणारास त्याचा कांहींच उपयोग नाहीं. कारण त्याच्यामागें त्यानें राखून ठेवलेल्या द्रव्यावर दुसराच कोणी तरी चैन करितो. मृत्यु सदैव जवळ उभा आहे, तो आपल्यावर केव्हां झडप घालील याचा नियम नाहीं, असें समजून सदैव धर्मसंचय करीत असावें. ज्याच्या-कडून मित्रजन, ब्राह्मण आणि कुटुंबांतील माणसें यांचें उत्तम प्रकारें पोषण होतें, परोपकार घडतो, त्याचेंच जीवित सफळ समजावें. कृमिकीटकादिकांप्रमाणें नुसतें जिवंत राहून काय उपयोग ? परलोकीं सौख्य व्हावें म्हणून जो दान किंवा [illegible] त्याच्याच जन्माचें सार्थक होतें. केवळ आपलें पोट भरणारे पशूही पुष्कळ वर्षें वांचतात; या अनित्य शरिराचें पोषण करून त्याला पुष्ट करण्यांत व पुष्कळ जगण्यांत लाभ कोणता ?

धनतृष्णा कोणाची पूर्ण झाली आहे आणि होणार आहे ? व्यास म्हणतात, आम्हांस असें वाटतें कीं, जो कोणाला एक कवडीही देत नाहीं तोच पुरुष खरोखर त्यागी होय; कारण तो स्वतः कोणाला कांहीं देत नाहीं तरी, संचित द्रव्यांतला अल्पांश सुद्धां मरतांना बरोबर घेऊन जात नाहीं. सगळें दुसऱ्याकरितां मागें ठेवून जातो. पण जो दाता असतो तो मेल्यावरही धनाचा त्याग करीत

नाहीं. कारण त्यानें केलेल्या दानाचें पुण्यफल त्याला मरणानंतर प्राप्त होतें !! केव्हां तरी मृत्यु हा येणारच; परंतु दानादिक शुभकर्में करणारा मेला तरी त्याची कीर्ति मागें रहाते. पण जो अदाता असतो तो केवळ भारवाहक लंबकर्णच होय !

आप्तस्वकीयांस दान देणें हें कांहीं दान नव्हे. अशा दानास धर्म समजूं नये. फलाची इच्छा न करितां दिलेलें दान सर्वांत उत्तम होय. माता, पिता, बंधु, सासरा, स्त्री, पुत्र आणि मुलगी यांनां दिलेलें दान स्वर्गसुख प्राप्त करून देतें. पित्याला दिलेल्या दानाचे शतपट, मातेला दिलेल्याचे हजारपट आणि बहिणीला दिलेल्याचे लक्षपट फळ प्राप्त होतें. इतरांनां दिलेल्या दानाचें फळ अक्षय समजावें. सत्पात्र ब्राह्मणांत कोणी वेदपाठी असतो आणि कोणी तपस्वी असतो, पण सर्वांत श्रेष्ठ सुपात्र ब्राह्मण ह्मटला ह्मणजे, ज्यानें आजन्म कधींही शूद्राचें अन्न भक्षण केलेलें नाहीं, तोच होय. शेजारच्या मूर्ख ब्राह्मणाला दान न देतां दूर रहाणाऱ्या सत्पात्र ब्रह्मणाला दान द्यावें. देवमंदिराकडे विनियोग होणाऱ्या द्रव्याचा अपव्यय केल्यानें, कोणत्याही रीतीनें ब्राह्मणाचें धन हरण केल्यानें आणि विद्वान् ब्राह्मणाचा तिरस्कार केल्यानें, पातक लागतें. ज्याप्रमाणें राखेंत हवन करणें व्यर्थ त्याप्रमाणें वेदज्ञानरहित ब्राह्मणाला दान देणें व्यर्थ होय. लांकडाचा हत्ती, चामड्याचें हरीण, आणि

उजाड गाव जळरहित कूप आणि अविद्वान् ब्राह्मण हे असून नसून सारखेच होत.

ज्याचा विनियोग विद्वानांना देण्यात किंवा हवनात होतो तेंच द्रव्य समजावें.

सम ब्राह्मणास दिलेलें दान तितकेंच फळ देतें. ब्राह्मणब्रुवास दिलेलें दुप्पट, आचार्यास दिलेलें हजारपट व वेदपारगास दिलेलें अनंत फळ देतें.

## ब्राह्मणांचे तीन प्रकार.

ब्राह्मण आईबापापासून उत्पन्न झाला असून, ज्याचे व्रतबंधादि संस्कार वेदमंत्रांनीं झाले नाहींत, ज्याला गायत्रीमंत्रही येत नसून जो ब्राह्मणजातींत उत्पन्न झाला असल्यामुळें, दानादिक घेऊन त्यावर आपली उपजीविका चालवितो, त्यास सम ब्राह्मण म्हणतात.

ज्याचे गर्भाधानादि संस्कार वेदमंत्रांनीं झाले असून गायत्रीमंत्र जाणतो, परंतु वेदाभ्यास ज्यानें केला नाहीं, त्यास ब्राह्मणब्रुव ह्मणतात.

जो अग्निहोत्री व तपस्वी असून, विद्यार्थ्यांकडून द्रव्य न घेता त्यास कल्प, वेदांगे, आणि उपनिषदें हीं शिकवितो त्यास आचार्य ह्मणतात

## दानाचें फळ.

वेदरूपी नांगरानें नांगरलेली जी सत्पात्र ब्राह्मणाची शरीररूपी भूमि, तींत पूर्वजन्मीं पेरलेलें उत्तम दानरूपी बीज उगवून, वाढून त्याला आलेलीं मधुर फळें ह्मणजे हत्ती, घोडे, पालखी, रथ इत्यादि संपदा होय. याचा अर्थ

असा कीं, सत्पात्र ब्राह्मणाला दिलेल्या दानाचें फळ—सुख-संपदा—पालखी, रथ आदि— दात्यास या जन्मीं मिळतें.

शंभरांत शूर एखादाच असतो; हजारांत एखादाच पंडित आढळतो; दहाहजारांत एखादाच वक्ता ( शास्त्राचें रहस्य उत्तम प्रकारें समजून सांगणारा ) असतो. आणि लाखांतही एखादा दाता सांपडेल किंवा नाहीं, याची शंकाच आहे.

रणांगणांत विजय मिळविणारा ह्मणजे शूर, असें येथें समजूं नये; तर जो आपलीं इंद्रियें जिंकतो तोच खरा शूर होय, वेदशास्त्रादिकांचें अध्ययन केलें ह्मणजे पंडित झाला असें नव्हे; तर शास्त्रोक्त धर्मकर्मांचें जें यथास्थित आचरण करितो, तोच पंडित समजावा. मोठमोठीं व्याख्यानें झोड-णारा, आपल्या वाणीनें श्रोतृसमाजास थक्क करून सोड-णारा वक्ता नव्हे; तर दुसऱ्याचें कल्याण व्हावें ह्मणून विहित उपदेश करणारा वक्ता होय. आणि श्रद्धायुक्त जो दान देतो तोच दाता होय.

कोणी आवडता ह्मणून किंवा कोणी कांहीं आपलें अहित करील या भीतीनें, अथवा धनादिकांच्या लालसेनें, एकाच पंक्तीस भोजनास बसलेल्यांस कमी अधिक—चांगलें वाईट—अन्नादिक पदार्थ वाढणारास, ब्रह्महत्येचें पातक लागतें, असें सर्व ऋषींचें मत आहे.

खडकावर पेरलेलें बीं, फुटक्या भांड्यांत ठेवलेलें दूध, राखेंत केलेलें हवन आणि मूर्खास दिलेलें दान हीं सर्व व्यर्थ होत.

पंक्तिप्रपंच करणारा, पंचमहायज्ञ न करणारा, ब्राह्मणांची निंदा करणारा, परसेवा करणारा, आणि वेदविक्रय करणारा यांस ब्रह्महत्येचें पातक लागतें.

---

## शंखस्मृति.

ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य यांना द्विज ह्मणतात. यांचा दुसरा जन्म यज्ञोपवित संस्कारानंतर समजावा. या संस्कारानंतर त्यांचा पिता, आचार्य आणि माता गायत्री समजावी. ब्राह्मणकुमाराचे वेदविहित संस्कार होण्यापूर्वी तो शूद्राप्रमाणें समजावा.

### कोणता संस्कार कधीं करावा.

स्त्रीला प्रथम गर्भ राहिला आहे असें समजूं लागतांच गर्भाधान संस्कार करावा; पोटांत गर्भ फिरूं लागण्यापूर्वी पुंसवन संस्कार करावा; सहावे किंवा आठवे महिन्यांत सीमंत, बालक जन्मतांच जातकर्म आणि जननाशौचानंतर नामकरण, हे संस्कार करावे.

चारही वर्णांचे बालकांचें नांव सम अक्षरांचें ठेवावें. ब्राह्मणकुमाराचें नांव शुभोच्चार होईल असें ठेवावें. जसें प्रमुदत्त; क्षत्रियकुमाराचे नांवांत बलाचा उच्चार झाला पाहिजे; जसें अरिंदम; वैश्याचें नांव धनाचें दर्शक असें असावें; जसें लक्ष्मीचंद्र; आणि शूद्राचे नांवांत दासत्व दर्शविलें जावें; जसें देवीदास. ब्राह्मणाचे नांवाचे अंतीं शर्मा हीं अक्षरें यावीं; जसें विष्णुशर्मा; क्षत्रियाचे नांवाचे अंतीं

वर्मा; जसें रामवर्मा; वैश्याचे नांवाचे अंतीं गुप्त, जसें चंद्रगुप्त आणि शूद्राचे नांवाचे अंतीं दास; जसें देवदास.
चवथे महिन्यांत बालकास सूर्यदर्शन करवावें; याला निष्क्रमण संस्कार ह्मणतात. सहावे महिन्यांत अन्नप्राशन व पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षी—कुलाचाराप्रमाणें मुंडण संस्कार करावा.

गर्भापासून आठवे वर्षी ब्राह्मण, अकरावे वर्षी क्षत्रिय, आणि बारावे वर्षी वैश्य, यांचा उपनयन संस्कार करावा. ब्राह्मणास सोळा वर्षेपर्यंत, क्षत्रियास बावीस वर्षेपर्यंत आणि वैश्यास चोवीस वर्षेपर्यंत गायत्रीमंत्र घेण्याचा अधिकार आहे. यापुढें मंत्राधिकार नाहीं. अधिकार नष्ट झाल्यावर ते व्रात्य—पतित—होत. त्यांस शूद्र समजावें.

ब्राह्मणास मुंजा, क्षत्रियास मूर्वा आणि वैश्यास सण, यांचें कटिसूत्र असावें; ब्राह्मणास मृगचर्म, क्षत्रियास व्याघ्रचर्म आणि वैश्यास बस्त (बोकड) चर्म यांचें आसन असावें; तिन्ही वर्णांच ब्रह्मचाऱ्यांत अनुक्रमें पळस, पिंपळ, आणि बेल यांचा दंड असावा. ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचा दंड मस्तकावरील केसापर्यंत, क्षत्रियाचा डोक्यापर्यंत आणि वैश्याचा तोंडापर्यंत पुरेल इतका उंच असावा. ब्राह्मणास कापसाचें, क्षत्रियास अतसीचें, आणि वैश्यास कोंकरीचें जानवें असावें. आणि वस्त्रेंही त्यांचींच असावीं; भिक्षा मागतांनां ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यानें ' भवति भिक्षांदेहि ' क्षत्रियानें ' भिक्षां भवतिदेहि ' आणि वैश्यानें ' भिक्षांदेहि भवति ' असें ह्मणावें.

## ब्रह्मचाऱ्याचे धर्म.

गुरूनें शिष्यास प्रथम शौच व नंतर आचार शिकवावे. जो शिष्याचें उपनयन करून त्याला वेद पढवितो त्यास गुरु ह्मणतात. आणि जो शिष्याकडून द्रव्य घेऊन त्याला वेदादिक पढवितो त्यास उपाध्याय ह्मणतात; माता, पिता, आणि गुरु यांची सेवा करावी. कारण जो पुत्र अथवा शिष्य, त्यांची सेवा करीत नाहीं त्याचीं सर्व पुण्यकर्में निष्फळ होतात.

नित्य प्रात:कालीं उठून, स्नान आणि हवन करून, गुरूला अभिवादन करावें; नंतर गुर्वाज्ञेनें वेदपठण करावें. आरंभीं आणि अंतीं ॐकाराचा उच्चार करावा. अनाध्यायाचे दिवशीं वेदपठण करूं नये.

चतुर्दशी, पौर्णिमा, अष्टमी, सूर्यचंद्रग्रहण इत्यादि समयीं वेदपठण करूं नये.

ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यानें विशेषकरून गृहस्थाचे घरीं भिक्षेस जावें. भिक्षा आणिल्यावर गुरूची आज्ञा घेऊन, पूर्व दिशे-कडे तोंड करून भोजन करावें. अहंकाराचा त्याग करून गुर्वाज्ञेंत वागावें. गुरू निजल्यावर आपण निजावें आणि ते उठण्यापूर्वीं निजून उठावें. मद्य, मांस, डोळ्यांत अंजन घालणें, गाणें, बजाविणें, स्त्रियांशीं संभाषण, हिंसा हीं ब्रह्मचाऱ्यानें करूं नयेत.

ब्रह्मचाऱ्यानें मेखला, दंड, आणि मृगचर्मासन हीं धारण करावीं. भूमिशयन करावें. वेदाध्ययन पूर्ण झाल्यावर गुरूच्या आज्ञेनें समावर्तन करावें.

## विवाहविधि.

जी आपल्या गोत्रांत किंवा प्रवरांत उत्पन्न झालेली नाहीं अशी सुशील कन्या पाहून, तिजबरोबर विवाह करावा. ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच असे विवाहाचे आठ प्रकार सांगितलेले आहेत. यांत पहिले चार प्रकार उत्तम होत; गांधर्व, आणि राक्षस हे प्रकार क्षत्रियांस उत्तम होत. शेवटचा प्रकार निंद्य मानिला आहे. प्रयत्नानें, प्रार्थना करून वेदविधीनें जो विवाह होतो तो ब्राह्मविवाह होय; यज्ञांत ऋत्विजाला वेदविधीनें कन्या देणें हा दैवविवाह होय; दोन गाई किंवा त्याबद्दल द्रव्य वराकडून घेऊन त्याला कन्या देणें याला आर्षविवाह ह्मणतात; कन्येच्या पित्याची अथवा पालकाची ' मला कन्या द्या ' अशी प्रार्थना करून, वेदोक्त विधीनें तिच्याबरोबर केलेल्या विवाहास प्राजापत्य ह्मणतात; द्रव्य घेऊन कन्या देणें हा आसुरविवाह होय; कन्या आणि वर या दोघांच्या इच्छेनें जो विवाह होतो तो गांधर्व विवाह समजावा; कन्येच्या पालकाला युद्धांत जिंकून, कन्येचें हरण करून तिजबरोबर विवाह करणें हा राक्षसविवाह होय; आणि छळ करून, चोरून कन्या नेऊन तिच्याबरोबर केलेला विवाह पैशाच होय;

## स्त्रीचें गृहकृत्य.

स्त्रीनें घरांतील वडील माणसांस सांगितल्यावांचून कोठें बाहेर जावूं नये. जातांना अंगावर उत्तरीयवस्त्र अवश्य घ्यावें. ( डोक्यावरून पदर घेणें हा उत्तरीयाचा पर्याय आहे. पण

त्याच्यावरूनही शाल किंवा शेला असल्यास फारच उत्तम. त्वरेनें जाऊं नये; ( अर्थात पायाकडे पहात हळु हळु गमन करावें. ) वाणी, संन्यासी, वृद्ध व वैद्य यांच्यावांचून दुसऱ्या कोणत्याही परपुरुषाशीं भाषण करूं नये. आपली बेंबी कोणास दिसेल असें वस्त्र नेसूं नये; पायांच्या घोट्यापर्यंत वस्त्र नेसावें. स्तनावरील पदर दूर होईल व त्यामुळें तो भाग दृष्टोत्पत्तीस येईल अशा हलगर्जीपणानें राहूं नये. अस्ताव्यस्त तोंड वासून हंसूं नये; तर तोंडावर पदर किंवा हात धरून हंसावें; पति व त्याचे बंधु यांच्याशीं द्वेष करूं नये; वेश्या, धूर्त, व्यभिचारिणी, संन्याशीण, शकुनादि पहाणारी, कपटी, चेटकी व दुःशील इतक्या स्त्रियांचा सहवास करूं नये. वाईट शब्द तोंडांतून काढूं नयेत.

## पंचमहायज्ञ.

गृहस्थाश्रमी पुरुषाला, चूल, जातें, केरसुणी, उखळ आणि पाण्याची घागर यांपासून ( ह्मणजे चूल पेटविणें, पाणी भरणें इत्यादि कृत्यांमुळें ) रोज हत्या घडते. त्या पापापासून मुक्त होण्याकरितां, त्याला नित्य पंचमहायज्ञ अवश्य केले पाहिजेत. ते पांच यज्ञ ह्मणजे, देवयज्ञ, पितृ-यज्ञ, भूतयज्ञ, ब्रह्मयज्ञ आणि मनुष्ययज्ञ हे होत.

वानप्रस्थ, ब्रह्मचारी आणि संन्यासी यांचें उपजीवन गृहस्थाच्या भिक्षारूप प्रसादानें चालतें. गृहस्थच यज्ञ करितो. तोच तप करितो आणि दानही तोच देतो, यास्तव गृहस्थाश्रम सर्व आश्रमांत श्रेष्ठ होय. स्त्रियांचें रक्षण पति करितो, धर्माचें रक्षण ब्राह्मण करितात त्याप्रमाणें अतिथि हा गृहस्थाचा प्रभु होय.

## आश्रमधर्म-इत्यादि.

स्नान करून मौनव्रत स्वीकारून आणि अग्निसेवा करून ब्रह्मचाऱ्याला स्वर्ग मिळत नाहीं; तर गुरुपूजा, व गुरूचे ठिकाणीं श्रद्धा ठेवल्यानें त्याला स्वर्गप्राप्ति होते.

मोठमोठे यज्ञ करून व ऋत्विजांनां विपुळ दक्षिणा देऊन आणि हवन करून गृहस्थाला स्वर्गप्राप्ति होत नाहीं. तर ती अतिथिसेवेनें होते. याकरितां गृहस्थानें अतिथिसत्कार अवश्य करावा.

नंतर अग्निसेवा—पंचाग्निसाधन—क्षमा, आणि वारंवार स्नान केल्यानें वानप्रस्थाला स्वर्ग मिळत नाहीं, तर इंद्रियांची चंचलता नष्ट झाल्यानें आणि परमार्थविचारानें त्याला स्वर्ग प्राप्त होतो.

तिन्हीं, दंडांनीं, मौनव्रतानें आणि निर्जन स्थळीं राहिल्यानें संन्याशाला इष्टसिद्धि प्राप्त होत नाहीं, तर योगाभ्यासानेंच त्यास उत्तम गति प्राप्त होते.

व्रतोपवासांनीं किंवा अनेक यज्ञ करून राजाला स्वर्ग मिळत नाहीं. पण धर्मानुसार प्रजेचें पालन केल्यानें त्याला स्वर्गप्राप्ति होते.

पुत्रपौत्रादिक झाल्यावर वृद्धावस्था प्राप्त झाली असतां गृहस्थानें वानप्रस्थाश्रम स्वीकारावा. तो आश्रम पुरा झाल्यावर त्यानें संन्यासाश्रम घ्यावा. भिक्षा मागून उदरपोषण करावें, जें मिळेल त्यांत संतोष मानावा. त्यानें धातूचें पात्र घेऊं नये. तुंबा ( भोंपळा ) घ्यावा. संन्याशानें मार्ग

न्याहाळून पाऊल टाकावें. सत्य बोलावें. वस्त्रानें गाळून पाणी प्यावें; आणि शुद्ध मनानें देशपर्यटण करावें, त्यानें समदृष्टि असावें. मातीचें ढेकूळ, दगड आणि सोनें हीं त्यानें सारखींच समजावीं. ईशचिंतन आणि योगाभ्यास हीं करावीं, ह्मणजे त्याला परमगति प्राप्त होते.

जिवंत असतांच जो जन्ममरणांचे बंधनांतून मुक्त होतो, मानसिक आणि शारीरिक पीडा ज्याला होत नाहींत त्यालाच विद्वान् लोक ब्राह्मण ह्मणतात.

प्राणत्यागानें इंद्रियदोषांचा, धारणेनें शारीरिक पापांचा, प्रत्याहारानें संगाचा आणि ध्यानानें ईश्वरविषयींच्या विरोधी नास्तिकपणाचा नाश करावा.

प्राणनिरोध करून ॐकारासह ॐभूः, भुवः, स्वः, महः, जनः, तपः, सत्यम् या व्याहृति मंत्रांची तीनदां आवृत्ति करणें याला **प्राणायाम** ह्मणतात.

मनाचें आकलन करणें याला **धारणा** ह्मणतात. इंद्रियांनां विषयांपासून पराङ्मुख करणें याला **प्रत्याहार** ह्मणतात. ध्यानयोगानें हृदयांत ब्रह्मास पहाणें याला **ध्यान** ह्मणतात.

## अध्यात्मविवेक.

सर्व देवता, प्राण, तारागण आणि सूर्य हीं सर्व अध्यात्मरूपानें आपल्या हृदयांतहि रहात आहेत; आपलें शरीर ही अधरारणी आणि ॐकार वरील अरणी आहे असें [illegible] ध्यानरूप मंथनानें हृदयांत वास्तव्य करणाऱ्या

परब्रह्म परमात्म्याचा साक्षात्कार होण्याकरितां रात्रंदिवस अभ्यास करावा. ज्यानें शोक मोहादिकांचा त्याग केला आहे तो तेजोरूप आत्म्याचें महत्व, ईश्वरकृपेनें पाहूं शकतो. अज्ञानरूप अंधःकारानें जे आंधळे झाले आहेत त्यांना परमात्म्याचा साक्षात्कार होत नाहीं.

सर्वांच्या हृदयांत सदैव वास करणारा पुरुषरूप परमात्मा सर्वव्यापक, प्रकट आणि अप्रकट, सगुण आणि निर्गुण-रूपानें नित्य आहे. तोच धाता, विधाता, पुरातन, आणि कल्याणस्वरूप आहे. तो सूर्याप्रमाणें तेजस्वी आणि तमो-गुणरहित आहे. त्याला जाणल्यानें मनुष्य मृत्यूला भीत नाहीं. तोच मोक्षमार्ग होय. त्याच्यावांचून ( त्याला जाणल्यावांचून ) मोक्षदायक दुसरा कोणी नाहीं.

पृथ्वी, जळ, तेज, वायु आणि आकाश हीं पांच महा-भूतें ( पंचतत्वें ) होत. मनुष्याला डोळे, कान, त्वचा, रसना आणि घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें आहेत, त्यांचे रूप, शब्द, स्पर्श, रस आणि गंध हे अनुक्रमें पांच विषय आहेत ह्मणजे त्या त्या इंद्रियाला त्या त्या विषयाचें ज्ञान होतें.

हस्त, पाद, गुह्य, जिव्हा, आणि गुद हीं पांच कर्मे-द्रियें होत. मन, बुद्धि, आत्मा, अव्यक्त हीं चार सूक्ष्म तत्वें होत. हीं चोवीस आणि ईश्वर मिळून पंचवीस तत्वें आहेत. जे सत्पुरुष, ज्याला जाणिल्यानें संसारबंधनांपासून मुक्त होतात तो परब्रह्म परमात्मा गुप्त, अविनाशी आणि सर्वांहून श्रेष्ठ, असा आहे. त्या परमात्म्याचे ठायीं, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, दुःख, सुख हीं नाहींत. तो सर्वव्यापक शुद्ध आहे.

## अष्टादश स्मृतिसार.

जन्म आणि कर्म यांच्या वासनेनें रहित, शांत, अव्यक्त, नित्य आणि अविनाशी असून ज्याला आदि आणि अंत नाहीं, जें परब्रह्मरूप आहे, तेंच परमात्म्याचें परमपद होय.

वालाग्राचे हजार भाग करून त्यांतील एका भागाचा जो शतांश त्यापेक्षांहि जीव सूक्ष्म आहे; असें ह्मटलें आहे.

शब्दादि विषय सूक्ष्मकारणरूप–इंद्रियांना पर–असे आहेत. त्यांपेक्षां सूक्ष्मकारण मन, त्याहून बुद्धि, तीहून महत्तत्व सूक्ष्म होय; महत्तत्वाहून सूक्ष्मकारणप्रधान आणि प्रकृति, अव्यक्ताहून सूक्ष्म पुरुष आहे. त्याहून सूक्ष्मकारण कोणीहि नाहीं. तोच स्थीरतेची सीमा असून परमगति आहे. तो परमात्मा पटांतील सूत्राप्रमाणें चराचरांत सदैव भरून राहिला आहे.

## गायत्रीमंत्राचें महात्म्य.

सर्व वेदमंत्रांत गायत्रीमंत्र श्रेष्ठ होय. ॐकारास प्रणव असें नांव आहे. व्याहृति प्रणवासहित जो मनुष्य सदैव गायत्रीमंत्राचा जप करितो, त्यास कोठेंही भय रहात नाहीं. गायत्रीमंत्रानें केलेलें हवन सर्व कामना पूर्ण करितें. ज्याला शांति पाहिजे असेल त्यानें, शुद्धाचरणानें गायत्री जप व हवन करावें. गायत्रीमंत्राचा जप करणारा इच्छित लोकाची प्राप्ति करून घेतो; गायत्री वेदांची माता आणि सर्व पापांचा नाश करणारी आहे. नरकरूपी समुद्रांत बुडणाऱ्यास गायत्री तारक होय; गायत्रीचा जप करणाऱ्या ब्राह्मणांचा सत्कार, हव्यकव्यानें करावा. कमळपत्रावरील जलबिंदुप्रमाणें, गायत्री जप करणारास पातकें लागत

नाहींत. जपामुळेंच ब्राह्मणाला सिद्धि प्राप्त होते. तो दुसरीं पुण्यदायक कृत्यें करो अथवा न करो, त्याला मैत्र ह्मणतात. जप करितांना मंत्राक्षरांचा उच्चार मोठ्यानें करूं नये मनांतल्या मनांत जप करणें उत्तम होय. गायत्रीमंत्राच्या जपानें स्वर्ग प्राप्त होतो. आणि मोक्षहि प्राप्त करून घेत येतो. यास्तव सर्व पापांचा नाश करणाऱ्या या मंत्राचा ज शुद्धांत:करणानें अवश्य करावा.

---

# दक्षस्मृति.

आठ वर्षांचें वय होईपर्यंत, यज्ञोपवितसंस्कारापू असत्य भाषणादिकांचा दोष बालकाला लागत नाहीं. सो वर्षें होईपर्यंत संसारांतील व्यवहारास बालकास यो समजूं नये.

## नित्यकर्म.

नित्य सूर्योदयापूर्वी—चार घटका रात्रीस—उठून प्र विधि आटोपून स्नान करावें. मनुष्याच्या शरीरास दरवाजे असून त्यांतून मळ निघत असतो. या प्रात:काळीं स्नान करून शरीर शुद्ध करावें. स्ना केल्यावांचून जप, होमादि कृत्यें करूं नयेत. स्नान के रूप, बुद्धि, बळ, तेज, आरोग्य इत्यादिकांची प्राप्ति प्रात:स्नानानें मन प्रसन्न होतें, रूप आणि सुभ

## पोष्यवर्ग.

माता, पिता, गुरु, स्त्री, संतति, दीन, अनाथ, सेवक, अभ्यागत, अतिथि आणि अग्नि हे गृहस्थाचे पोष्य होत. त्यांचें पालनपोषण आणि सेवा केल्यानें इहपरलोकीं सौख्य प्राप्त होतें. याकरितां त्यांचें यथायोग्य पोषण करणें हें गृहस्थाचें कर्तव्य होय. याशिवाय धनवान् असेल त्यानें स्वकुलांत जन्मलेले अथवा आप्तसंबंधी, यांत जे कोणी अनाथ, दुर्बळ, दरिद्री असे असतील, व ते आपल्या आधारास येतील तर त्यांचेंही पोषण करावें; जो इतरांचें पोषण करितो त्याचें जीवित यथार्थ होय. केवळ आपलेंच पोट भरणारे असून नसून सारखेच! ज्याला आपल्या कल्याणाची इच्छा असेल, त्यानें दीनदुबळ्यांस अवश्य सहाय्य करावें. दान दिलेलें आणि हवन केलेलें द्रव्यच आपलें होय; पुष्कळ संग्रह करून ठेविला तरी तो दुसऱ्याकरितांच होय.

## गृहस्थाश्रमाचें श्रेष्ठत्व.

देवता, मनुष्य आणि पशुपक्षादिक हे गृहस्थामुळेंच जिवंत असतात; ह्मणून गृहस्थाश्रम धन्य होय. गृहस्थापासूनच ब्रह्मचारी, वानप्रस्थ, आणि संन्यासी यांची उत्पत्ति होते. ह्मणून तिन्ही आश्रमांस गृहस्थाश्रमच मूळ आहे; वृक्षाच्या मुळाचें रक्षण केल्यानें त्या वृक्षास शाखा उपशाखा फुटून पानें येतात. परंतु जर मूळच तोडून टाकिलें

सर्व आश्रमांस मूळ जो गृहस्थाश्रम त्याचें आदरपूर्वक रक्ष
केलें पाहिजे. गृहस्थ आपलीं आश्रमकृत्यें यथास्थित कर
राहिला तरच त्याला सौख्य प्राप्त होतें. आश्रमास विहि
अशीं कृत्यें न करणारा, स्त्रीपुत्रादिकांचा परिवार बाळगू
घरांत राहिल्यानें त्याला गृहस्थ ह्मणत नाहींत. स्नान, हव
आणि दान केल्याशिवाय जो भोजन करितो तो देवतादि
कांच्या ऋणांत राहून अधोगतीस जातो.

आपल्या धनादिकांतून थोडेंबहुत दुसऱ्याला देण्याच
ज्याची वासना आहे, जो क्षमाशील, दयाळु आणि देव
अतिथींचा भक्त आहे, तोच गृहस्थ धार्मिक होय. दया
लज्जा, क्षमा, श्रद्धा, बुद्धिमत्ता, त्याग आणि कृतज्ञता
गुण ज्याच्या ठिकाणीं वास करितात तोच सद्गृहस्थ होय

## गृहस्थाचीं एक्याऐशीं कर्में.

नऊ सुधारूप, नऊ मध्यम, नऊ कर्तव्यें, नऊ अकर्मे
नऊ गुप्त कर्में, नऊ उघड कर्में, नऊ सफळ कर्में, नऊ
विफळ कर्में, आणि नऊ वस्तु देण्यास अयोग्य, मिळून
एक्याऐशीं कर्में गृहस्थाचीं सांगितलीं आहेत.

९ सुधारूपः-सज्जन, प्रतिष्ठित गृहस्थ आपल्या घरं
आला असता मन, नेत्र, मुख आणि वाणी हीं श्रद्धायुक्त
कोमळ ठेवणें, त्यास सामोरें जाणें, येण्याचें कारण विचा-
रणें, गोड बोलणें, आदर करणें आणि त्याची सेवा करणें:-

९ मध्यमः-भूमि, जळ, कुशासन, पाय धुणें, तेल
लावणें, आसन देणें, शय्या, पलंग, जें असेल तें व
अतिथि मागेल तें देणें; हीं गरिबाच्या घरीं सुद्धां मिळ-
ण्यासारखीं असतात.

९ कर्तव्यें.:– स्नान, संध्या, जप, होम, वेदपठण, देव-पूजा, वैश्वदेव, क्षमा आणि अतिथिसत्कार किंवा पितर, देव, मनुष्य, गुरु, तपस्वी, दीन, अनाथ, माता आणि पिता यांचा सत्कार. हीं नऊ कर्मे केल्यानें त्यास धार्मिक ह्मणतात.

९ विकर्मे:–असत्य भाषण, परस्त्रीगमन, अभक्ष्य भक्षण, अगम्य स्त्रीगमन, अपेयपान ( दारू इत्यादि ), चोरी, हिंसा, वेदांस अमान्य असें कर्म, धर्मविरुद्ध मित्रत्व, हीं नऊ कर्मे केल्यानें लोकनिंदेस पात्र होतो.

९ गुप्त कर्मे:–चहाडी, असत्य भाषण, कपट, काम, क्रोध, दुसऱ्याचें वाईट इच्छिणें, द्वेष, दंभ, द्रोह हीं कर्मे निंद्य होत; त्यांचा त्याग करावा. अथवा गाणें, वाजविणें, कृषिकर्म, दास्यत्व, व्यापार, मीठ तयार करणें अथवा विकणें, जुगार, शस्त्रें तयार करणें, आणि आत्मस्तुति. हीं कर्मे अयोग्य होत.

वय, धन, गृहछिद्र, मंत्र, मैथुन, औषध, तप, दान आणि अपमान हीं गुप्त असावीं.

९ सफल कर्मे:–माता पिता, गुरु, मित्र, नम्र, उप-कारी, दीन, अनाथ, सज्जन, धर्मात्मा विद्वान यांना दान देणें सफल होय.

९ विफल कर्मे:-धूर्त, कैदी, मल्ल, कुवैद्य, कपटी, शठ, ठग, भाट आणि चोर यांना देणें विफल होय.

९ देण्यास अयोग्य:–आपणास अवश्य लागणाऱ्या

स्त्री, मित्राचें धन, शरण आलेला मनुष्य, दुसऱ्या
ठेवलेली वस्तु, आणि आपलें सर्व धन हीं मोठी आ
प्राप्त झाली तरी भिऊन जाऊन कोणास देऊं नयेत.

९ उघड कर्में:—कर्ज देणें, कर्ज फेडणें, दान दे
वेदपठण, विक्रय, कन्यादान आणि वृषोत्सर्ग हीं उ
करावीं.

याप्रमाणें वर्तन करणारा पुरुष या लोकीं मानमान्य
मिळवून परलोकींहि सौख्य भोगितो.

## दान.

कष्ट केल्याशिवाय द्रव्य मिळत नाहीं, आणि पैशावांचू
धर्मकर्में यथास्थित होत नाहींत. निर्धन मनुष्य धर्म करी
नाहीं आणि धर्महीनाला सुखप्राप्ति होत नाहीं.

प्रत्येक मनुष्य सुखप्राप्तीची इच्छा करीत असतो
धर्म केल्यानेंच तें प्राप्त होतें. यास्तव धर्म अवश्य करावा
न्यायमार्गानें संपादन केलेल्या द्रव्यानें, परलोकीं सुख
व्हावें ह्मणून यज्ञादिक कृत्यें करावीं. गुणवान्, विद्वान्, सुपात्र
यांस विधिपूर्वक दान द्यावें. ब्राह्मणादि विद्वान् सुपात्रांस
दान दिल्यानें दुप्पट फळ प्राप्त होतें. आचार्यास दिल्यानें
हजारपट आणि वेदवेत्त्यांस दिल्यानें अनंतफळ प्राप्त होतें.
विधिरहित आणि कुपात्रास दिलेलें दान निष्फळ होतें.
आपलें किंवा आपल्या परिवाराचें दुःख नष्ट व्हावें ह्मणून
कोणी दान मागत असेल तर त्यास अवश्य दान द्यावें;
असें दान श्रेष्ठ मानिलें आहे.

ज्यांचे आईबाप मरण पावल्यामुळें जीं मुलें अनाथ
झालीं असतील त्यांचें पालनपोषण करून त्यांस सन्मार्गास

मोठें पुण्य प्राप्त होतें. अग्निहोत्र आणि अग्निष्टोम यज्ञ करूनहि जितकें पुण्य प्राप्त होत नाहीं, तितकें अनाथ मुलाचें पाळन करून त्याळा विद्या शिकवून सद्गृहस्थ केल्यानें प्राप्त होतें. आपणांस प्रिय असलेल्या वस्तु सत्पात्रीं दान दिल्यानें अक्षय्य सुखप्राप्ति होते.

## स्त्री कशी असावी.

पुरुषाचे आज्ञेंत वागणारी स्त्री गृहसौख्यास मूळ कारण होय; ती जर पतीच्या इच्छेप्रमाणें वागणारी असेल तर तो गृहस्थ धन्य होय. अशा स्त्रीच्या समागमानेंच धर्म, अर्थ आणि काम हे प्राप्त होऊन गृहस्थास सुखप्राप्ति होते. ज्याची स्त्री सर्व प्रकारें अनुकूळ असेल त्यास त्याच्या घरींच स्वर्ग आहे आणि प्रतिकूळ स्त्री असेल तर त्या गृहस्थास त्याचें घर हाच नरक होय.

स्त्रीपुरुषांत परस्पर पूर्ण प्रीति असणें ही गोष्ट स्वर्गांत सुद्धां दुर्लभ होय. एक प्रेमाची इच्छा करील व दुसरा विरक्त असेल तर यापेक्षां अधिक दुःखदायक काय आहे ? सुखाकरितां गृहांत रहावयाचें तें सुख धर्मपत्नीमुळेंच प्राप्त होत असतें. जी स्त्री नम्र, कोमळ स्वभावाची, पतीचें हृद्गत जाणणारी, आणि सर्व प्रकारें पतीच्या आज्ञेंत वागणारी, अशा स्त्रीलाच पत्नी ह्मणावें. सदैव दुर्मुखलेली, दुःख करणारी, पतीचें उणें पहाणारी अशा प्रतिकूळ स्त्रीच्या पतीस, आणि विशेषेंकरून दोन बायका असणाऱ्यास अतिशय दुःख होतें.

जळू ज्याप्रमाणें प्राण्याच्या अंगातील रक्त करून घेते, त्याप्रमाणें उत्तम प्रकारें पालन करा आपल्या पतीसहि वाईट स्त्री सदोदित त्रास देत असते. जळू केवळ रक्त तेवढेंच शोषण करिते, परंतु वाईट आपल्या नवऱ्याचें धन, अन्न, मांस, बळ आणि सुख यांचा सर्वस्वीं नाश करिते.

दुष्ट स्वभावी स्त्री जोंपर्यंत लहान असते तोंपर्यंत नवऱ्याला थोडीशी वचकून असते. ती तारुण्याचे भरांत आली ह्मणजे पतीचे तोंडास तोंड देते. आणि पतीला वृद्धत्व प्राप्त झालें ह्मणजे त्याला कस्पटासमान मानूं लागते. रोगाची उपेक्षा केल्यानें तो जसा वाढतो, त्याप्रमाणें, स्वच्छंदानें वागणाऱ्या स्त्रीस, प्रेमामुळें नवरा वेळींच जपणार नाहीं तर ती अधिक चढून नवऱ्याचे तोंडास तोंड देईल. पतीला अनुकूल, मधुरभाषणी, चतुर, सरळ स्वभावाची आणि पतिव्रता अशी स्त्री केवळ लक्ष्मी होय.

ज्याचे शिष्य, स्त्री, मुलें, बंधु, मित्र, सेवक आणि आश्रितजन हे नम्र, शिक्षित आणि मधुरभाषणी असतील त्या पुरुषाची मोठी प्रतिष्ठा वाढते. पहिल्या स्त्रीस धर्मपत्नी ह्मटलें आहे. ( ती जिवंत असतां ) दुसरी स्त्री कामवासना वाढविणारी होय. दोन बायका असल्या ह्मणजे काय स्थिति होते, ती बहुतेकांस ठाऊकच आहे. ह्मणून ( एक जिवंत असतां ) दुसरी स्त्री करूं नये.

## शरीरशुद्धि.

शरिराची शुद्धि दोन प्रकारची आहे. एक बाहेरची व दुसरी आंतली. पाणी, माती यांनीं बाहेरून शरीर शुद्ध

...वें आणि मन निष्कपटी असल्यानें आंतून शुद्ध होतें. पात... शुद्धिपेक्षां आंतील शुद्धि श्रेष्ठ होय. पवित्रता आणि चि... याचें मूळ शरीरशुद्धींतच आहे.

शौचानंतर मूत्रेंद्रियास एकदां, गुदास तीनदां, डावे हातास दहादां, दोन्ही हात एकत्र करून सातदां आणि पायांस तीनदां माती लावून धुवावें. प्रत्येक वेळीं पाण्यानें माती धुवून जाईल इतकें पाणी घ्यावें. ही शुद्धि गृहस्थाकरितां सांगितली आहे. याचे दुप्पट ब्रह्मचाऱ्यानें, तिप्पट वानप्रस्थानें आणि चौपट संन्याशानें शुद्धि करावी.

ज्याचें अंतःकरण शुद्ध नाहीं, त्यानें हजार वेळां माती लाविली किंवा शेंकडों घागरी पाणी ओतलें तरी व्यर्थ होय.

## योगाभ्यास.

प्राणायाम, ध्यान, प्रत्याहार, धारणा, तर्क आणि समाधि हीं योगाचीं सहा अंगें होत. मनुष्यानें आनंदाची प्राप्ति व्हावी म्हणून प्राणिमात्रांचे ठिकाणीं मित्रदृष्टि ठेवावी. केवळ अरण्यांत राहून अथवा अनेक शास्त्राध्ययन आणि मनन केल्यानें किंवा पद्मासन घालून आसन लावून आणि दुसरीं ढोंगेंसोंगें करून मंत्रांचा जप करून किंवा मौनव्रत स्वीकारून, अथवा अनेक पुण्यकृत्यें करून कोणी योगी होत नाहीं. तर योगाभ्यासांत सदैव काळ घालवून योगावर पूर्ण श्रद्धा ठेवून संसाराविषयीं उदासीनता प्राप्त होऊन वैराग्य अंगीं बाणल्यानें योगसिद्धि होते. ईश्वरचिंतनांत आनंद, पवित्र आचरण, आत्मस्वरूपीं रममाण होणें आणि समदृष्टि ठेवणें यामुळें योगसिद्धि होते. संसा-

यांतून मन काढून क्षेत्रज्ञ आत्म्याला परमात्म्याच्या करा
निमग्न ठेवणें यालाच मुक्ति ह्मणतात. । असते

योग्यानें मनाची मळीनता, अविद्या, चित्ताची वैईट
लज्जा आणि शंका यांनां जिंकून मन आपल्या ता
ठेवावें. मनाला देव, मनुष्य आणि राक्षस यांनां जिंकिता
येणें दुष्कर आहे. त्याला जिंकणारा असा एखादाच; मन
जिंकणें हाच परम योग होय. दुसऱ्याचें राज्य जिंकण
खरा शूर नव्हे. तर ज्यानें आपलीं सर्व इंद्रियें जिंकि
तोच खरा शूर होय. योगी स्वतः ब्रह्म जाणतो. त्या
ज्ञानाचा आनंद सांगतां येत नाहीं. जन्मांधास जसें घराचें
स्वरूप दिसत नाहीं, तद्वत् योगहीन मनुष्याला ब्रह्म ह्मणजे
काय तें दिसत नाहीं.

ज्यानें मनाची मळीनता नाहींशी केली तोच संन्यासी
होय. संन्याशानें आठ प्रकारच्या वाईट वासनांपासून दूर
असावें; एकट्यानें च वनांत संचार करावा; आणि परमा-
त्म्याचे ठायीं पूर्ण प्रेम ठेवावें.

---

# शातातपस्मृति.

## पूर्वजन्मार्जित पापचिन्हें.

ज्या मनुष्याचे हातून प्रायश्चितास योग्य असें कृत्य
घडलें असून त्यानें प्रायश्चित्त न घेतल्यामुळें, मरणानंतर
नरक भोगून, पापचिन्हांसह मनुष्ययोनींत जन्म घेतो. तीं
चिन्हें प्रायश्चित्तानें आणि पश्चात्तापानें पाप नाश झाल्यावर

नाहींशीं होतात. महापातकाचें चिन्ह सात जन्मपर्यंत, उपपातकाचें चिन्ह पांच जन्मपर्यंत आणि लहान पापाचें चिन्ह तीन जन्मपर्यंत असतें.

पापकृत्यांमुळें उत्पन्न होणारे रोग जप, देवपूजा, होम, दान इत्यादि पुण्यकृत्यें केलीं असतां दूर होतात. कुष्ठ, क्षय, संग्रहणी, मूत्रकृच्छ्र, अपस्मार, भगंदर, मूळव्याध इत्यादि भयंकर रोग, पूर्वजन्मीं केलेल्या पापांमुळें उत्पन्न होतात; त्यांच्या निवृत्तिकरितां मोठमोठीं दानें, तप आणि यज्ञ हीं पुण्यकृत्यें करावीं.

---

# वसिष्ठ-स्मृति.

---

## धर्म ह्मणजे काय?

वेद आणि धर्मशास्त्र यांत मनुष्याचीं जीं कर्तव्यकर्में सांगितलीं आहेत, त्यांस धर्म ह्मणतात. ज्या एखाद्या गोष्टीचें प्रमाण वेदशास्त्रांत सांपडणार नाहीं, तर ती गोष्ट धर्मज्ञ अशा शिष्टांच्या आचरणाप्रमाणें प्रमाण मानावी.

सुखाची इच्छा करणारानें, आपल्या कल्याणाकरितां धर्म चांगल्या प्रकारें जाणावा, त्याची आज्ञा मानावी आणि त्याचें श्रवण करावें. धर्माचरणानें मनुष्याची या लोकीं ख्याति होऊन अन्य जन्मीं त्यास सुख प्राप्त होतें.

आदर्शाचे पूर्वेस, कालक वनाचे पश्चिमेस, पारियात्राचे उत्तरेस, हिमालयाचे दक्षिणेस आणि विंध्याद्रीचे उत्तरेस जो देश त्याला आर्यावर्त ह्मणतात. या देशांतले

आणि आचार आहेत, ते सर्व विश्वासपात्र होत. कांहीं आचार्यांनीं गंगा आणि यमुना यांच्या मधील प्रदेशास आर्यावर्त ह्मटलें आहे.

तिन्ही वेदांचें ज्यांस चांगलें ज्ञान आहे आणि जे धर्मतत्वें जाणतात ते दाखवितील तो उत्तम धर्म होय. त्या धर्माचें आचरण श्रद्धापूर्वक शंका सोडून करावें.

## विद्या कोणास शिकवावी?

विद्यादेवि ब्राह्मणजवळ येऊन ह्मणाली, हे ब्राह्मणा, तुझें भांडार मींच आहें; तूं माझें रक्षण कर. निंदक, कठोर आणि लंपट अशा शिष्यांना तूं जर मला देणार नाहींस तर माझा पराक्रम आणि फळ तुला दाखवीन.

स्वतः पुष्कळ कष्ट सोसून शिष्याला वेद पढवितो आणि कायिक, वाचिक आणि मानसिक दुष्ट कर्मांचा नाश करितो, अशा गुरूला शिष्यानें आईबापांसारखें समजून त्याच्या विरुद्ध वर्तन करूं नये.

जे शिष्य मन, वाणी आणि शरीरानें आपल्या गुरूचा आदर करीत नाहींत, ते ज्याप्रमाणें गुरूचें रक्षण करण्यास योग्य होत नाहींत, त्याप्रमाणें त्यांची विद्या त्यांचें रक्षण करीत नाहीं.

विद्या ह्मणते, हे ब्राह्मणहो, जो शुद्ध, अप्रमादी, ब्रह्मचारी आणि बुद्धिमान् असा तुह्मांस वाटेल आणि जो कधींही तुमच्या विरुद्ध जाणार नाहीं अशी तुमची खात्री असेल त्यालाच मला द्या, ह्मणजे शिकवा. ज्याप्रमाणें तृणाला अग्नि जाळून टाकितो, त्याप्रमाणें गुरूचा अनादर करणाऱ्या

कुशिष्याला विद्या शिकविली असतां गुरूचें अकल्याण होतें म्हणून अशा शिष्याला विद्या शिकवूं नये.

## आततायी.

सहा प्रकारचे मनुष्य आततायी होत. ते प्रकार असे:– १ दुसऱ्याचे घरास आग लावणारा २ विषप्रयोग करणारा ३ हातांत शस्त्र घेऊन मारण्याकरितां धांवून येणारा ४ धन हरण करणारा ५ शेतीचा नाश करणारा आणि ६ जबरीनें परस्त्रीचें हरण करणारा किंवा तिचें पातिव्रत्य भ्रष्ट करणारा यांस मारिल्यानें हत्येचें पातक लागत नाहीं.

विद्वान् ब्राह्मण असला तरी तो जर आततायीपणानें आपल्यास मारावयास येत असेल तर त्यास मारल्यानें ब्रह्म-हत्येचें पातक लागत नाहीं. कारण हें क्रोधाक्रोधाचें युद्ध होय!

## सदाचारप्रशंसा.

आचार हाच सर्व वर्णांस श्रेष्ठ धर्म होय. सदाचारी मनुष्य इहपरत्रीं सौख्य पावतो. तप, दान, वेदपठण आणि अग्निहोत्र हीं कर्में आचाररहित आणि धर्महीन मनुष्याला दुःखसागरातून पार जाण्याला उपयोगीं पडत नाहींत; जरी अंगांसह वेद शिकलेला असला तरी आचारहीन पुरुषाला ते वेद पवित्र करीत नाहींत. आंधळ्यास दर्शनीय वस्तु-पासून जसें कांहींएक सौख्य होत नाहीं, तद्वत् आचारहीन पुरुषाला, तो वेदवेदांगें शिकलेला असला, यज्ञ करीत असला तरी त्यापासून त्याला सुखप्राप्ति होत नाहीं.

कपटी पुरुष वेद शिकलेला असला तरी पापापासून मुक्त होत नाहीं. परंतु शुद्धाचरणी मनुष्य, थोडे वेदमंत्र

शिकलेला असून श्रद्धापूर्वक त्यांचें पठण केल्यानें पवित्र होतो. दुराचरणी मनुष्य निंद्य, दुःखी, रोगी आणि अल्पायु होतो. शुद्धाचरणानें धर्म, धन, श्री, शोभा, प्रतिष्ठा इत्यादिकांची प्राप्ति होते. जो पुरुष श्रद्धाळू, समदृष्टि आणि सदाचारी असतो तो जरी सुंदर नसला, धनादिकांनीं हीन असला तरी शतायु होतो.

खाणेंपिणें, फिरणें, दुसऱ्यास भेटणें इत्यादि कामें धार्मिक मनुष्यानें मध्यम प्रमाणानें करावीं. वाचिक आणि बौद्धिक कर्में, तप, धन आणि आयुष्य यांचें रक्षण उत्तम प्रकारें केलें पाहिजे. मलमूत्रांचा त्याग दिवसा उत्तरेकडे तोंड करून व रात्रीं दक्षिणेकडे तोंड करून केल्यानें आयुष्यवृद्धि होते. अग्नि, सूर्य, गाय, विद्वान्, चंद्र, जलाशय आणि संध्या यांच्याकडे तोंड करून लघुशंका केल्यानें बुद्धि नष्ट होते. नदी, राख, शेण, नांगरलेलें किंवा पेरलेलें शेत आणि दाट उगवलेलें गवत यांवर लघुशंका करूं नये; आकाश ढगांनीं भरलेलें असतां, अंधारांत, आणि जीवजंतूंचें भय असेल तेथें, दिवस असो अथवा रात्र असो, जिकडे योग्य वाटेल तिकडे तोंड करून मलमूत्राचा त्याग केल्यास चिंता नाहीं.

योगाभ्यास, तप, मनाचें दमन, दान, सत्य भाषण, शुद्धता, दया, शास्त्रपठण, लेखन, तत्वज्ञानाचा अभ्यास, व्यवहारदक्षता आणि अस्तिक्य हीं लक्षणें ज्या ब्राह्मणाचे ठिकाणीं आढळतील तोच खरा ब्राह्मण होय.

॥ श्रीसच्चिदानंदार्पणमस्तु. ॥